


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका









रजतमहोत्सवी वर्ष

ऑक्टोबर १९६९

मूल्य १॥ रु.

## श्रेयनामावली

चक्रव्यूह... मवाल्यावर प्रेम केले ? **अशोक आघरकर** ● लोहगड ते लंडन... मध्यरात्रीचे सूर्यदर्शन... **ह. सी. उर्सेकर** ● शह.... स्त्रीदाक्षिण्य गुंडाळून ठेवणेच श्रेयस्कर... **शशिकान्त कोनकर** ● शाहिरी आणि पूर्वगामी अपभ्रंश वाङ्मय.... देसी भाषा—उभय तडुज्जल... **अनंत फंदी** ● रावसाहेब पटवर्धन एक देखणं कर्तृत्व हरपलं.... **रवींद्र पिंगे** ● 'दीपावली' तील परिसंवाद.... रजतमहोत्सवी खास लेख.... शां. शं. रेगे.

कविता : दत्ता खरे शिवाय रंगमंच, दीपमाला. आणि

### कुटुंबनियोजन पुरवणी

तसेच

* मासिक व्यंगचित्रमाला *

टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

संपादक—मुद्रक—प्रकाशक—मालक : श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किंमत १॥ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही.  Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio 42, Kennedy Bridge, Bombay—4.










अनुक्रमणिका

# नेमेचि येती, परि....

निसर्गाचा क्रम युगे लोटली तरी तोच तो त्याच त्या पद्धतीने चालू आहे. सूर्योदय व्हायचा तोच होतो. येण्यापूर्वी उषेचे ध्वज असेच किरणांच्या अश्वावर स्वार होऊन दिवस गाजविण्यासाठी धावत येतात. चंद्रावर माणूस पोहचला नव्हता तेव्हाही चंद्र कवि-प्रेयसी–प्रियकरांसकट साऱ्यांना सुशीतल होता तसाच तो चांद्र विजयानंतरही राहिला आहे. पूर्ण चंद्राच्या दर्शनाने अजूनही सागराला व कवींच्या प्रतिभेला भरती येते. वसंतात अजूनही कोकिळा गातात. आंबा मोहरतो. वर्षा ऋतूतले ढग अजूनही नटून सजून सृष्टीच्या सुमंगलासाठी धावतात. हे सारे होते तसेच चालू आहे. चालू राहणार आहे. कालचा दिवस आज रहात नाही. आजचा दिवस उद्याच्या दिवसाचे स्वागत गीत आळवीत कालांच्या विगमध्ये निघून जातो. तो दिवस पुन्हा तेच करतो. ही सारी परिक्रमणे करीत सृष्टी पुढे आणि पुढेच चालली आहे. पण ही रूपे तीच ती भासली तरी तीच ती नसतात. एखाद्या नाटकाचा पहिला आणि दोनशेवा प्रयोग वस्तुदृष्टचा तोच असला तरी शंभर टक्के तोच आणि तसाच नसतो. त्यातही काहीतरी नवे, आधीच्या एकशेंनव्याण्णव प्रयोगात नसलेले असे असतेच असते. नित्य उगवणारा सूर्य तोच असतो आणि तोच नसतोही. आंबा तोच असला तरी मोहर नवा असतो. माणूस तोच असला तरी माणसाचे 'क्षण' तेच नसतात. नित्य नव्याच्या दिशने ही जीवनसरिता धावत असते. हा प्रवाह खळाळतच राहतो. तो खळाळत राहतो तेव्हाच तो जीवन ह्या संज्ञेला पात्र ठरतो.

गणपती नेमेचि येतात, विजयादशमीच्या दिवशी 'मोरूचा बाप' मोरूला तेच ते म्हणतो. आणि मोरूही तेच व तसेच वागतो. पण मोरूचा बाप सतत बदलत आहे आणि नवे मोरू जुन्या मोरूंची जागा घेत आहेत. ते असेच 'बाप्पा मोरया' म्हणणार आहेत. विजयाचे वारस आम्ही. सांगतो आमुचा दसरा म्हणत म्हणत ह्या देशाच्या ध्वजाला वंदना देणार आहेत. त्याची मिरवणूक काढणार आहेत. कुणातरी इंदिराजींच्या नांवाने नव्या विजयाचा वारसा उद्घोषित करणार आहेत. माणसे बदलतील, तो बदलही ह्या सृष्टिक्रमाचाच एक अपरिहार्य भाग; पण विजयाचा वारसा महत्त्वाचा. सीमोल्लंघनाची कल्पना देवदर्शन व आपट्याची पाने लुटून (वा विकत) आणण्याच्या कल्पनेत सीमित होत नाही. मानवाच्या मनातली ती एक स्वाभाविक व आंतरिक ऊर्मि आहे. आंतरिक ऊर्मीच्या उमाळ्याने माणूस चंद्रावर उतरतो आणि चंद्रावरची एखादी अमर कविताही लिहितो. कल्याणकर अणूची निर्मिती करतो. स्वतः मृत्यु पत्करून जगातल्या असंख्यांचे जीव वाचविणारे एखादे औषध शोधून काढतो. दिवस–रात्रीच्या चक्रनेमिक्रमात माणूस क्षणाक्षणाला हे सीमोल्लंघन सतत करीतच असतो. सृष्टि असीम आहे तशीच मानवी प्रतिभा, प्रज्ञा, परिश्रम, सीमोल्लंघनाची ऊर्मि, समर्पणाची भावना, जगाच्या कल्याणार्थ उभी राहणारी 'संत' प्रवृत्ती, सीमेचा अभिमान आणि सीमेसाठी, सीमेच्या गौरवासाठी चंद्रावरही उडत जाण्याची ऊर्मि अशीच असीम आहे. माणूस विविध अवतार घेत असला तरी मला मात्र मानवाचा वामनावतारच मोह घालतो. त्याला त्याच्या पायाखाली जिंकण्यासारखे काही उरलेच नाही हा जो आनंद आहे तो अमाप आहे. असे कर्तृत्वाचे वामन सतत ही सृष्टि प्रसवीत आली आहे. त्या वामनाचे रूप कधी नील आर्मस्ट्राँग असेल, तर कधी शिवाजी असेल. कधी टागोर असेल तर कधी गांधी असेल. कधी चाफेकर असेल तर कधी सावरकर म्हणून पुढे येईल. पण असे असंख्य वामन सतत जन्मत आले आहेत म्हणूनच नेमेचि येणारा दसरा तो आणि तोच असत नाही. रहात नाही. चंद्राची सीमा ओलांडून जाणारा हा आधुनिक वामन मग मंगळाचा ध्यास घेतो. समाजचित्र पालटण्यासाठी एकादा भीमकाय भीमराव जीवनाची बाजी लावतो. एखादा पंडित आयुष्यभर सेवारत राहतो. माणसाने कधी सीमा मानल्याच नाहीत, त्याची सीमोल्लंघनाची ऊर्मि अमर आहे तोवर 'सीमोल्लंघना'चा दिवस तोच तो असला तरी त्याचे रूप मात्र तेच ते असणार नाही! सण तेच असले तरी सणांचे पक्वान्न–कमाई–तीच असणार नाही. अश्व बदलतील, कालमानानुसार ध्वज बदलतील, पोषाख बदलेल; पण सूय-चंद्र-मंगळादि ग्रहांवर झेपावत जाणाऱ्या माणसाची सीमोल्लंघनाची ऊर्मि मात्र तीच असेल. कारण ती ऊर्मि हे एक सनातन सत्य आहे. ती एक सार्वकालिक, चिरंतन गोष्ट आहे.

त्या ऊर्मीचा आम्ही जयजयकार करतो. तिचे स्वागत करतो.

——संपादक




**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :

३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५ द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी रु. ३० **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. २०

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.




अनुक्रमणिका







## दिवाळी अंकाच्या मानकऱ्यांची ही नावे पहा....

पु. भा. भावे
अरविंद गोखले
रणजित देसाई
जयवंत दळवी
अच्युत बर्वे
कुसुमाग्रज
ज्ञानेश्वर नाडकर्णी
बा. भ. बोरकर
माधव राजवाडे
आनंद साधले
मधु मंगेश कर्णिक
मंगेश पाडगांवकर
राजाराम हुमणे
सरोजिनी बाबर
वा. रा. कान्त
राजा बढे
सोपानदेव चौधरी
सुरेश वेंगुर्लेकर
वि. वा. पत्की

आणि

इतर ताज्या दमाचे लेखक

तसेच

विनोदी साहित्य स्पर्धेतील यशस्वी लेखक



....वरील नावे म्हणजे उत्कृष्ट साहित्याची हमीच





# रावसाहेब पटवर्धन

## एक चांदणं शिंपणारा जीव

तीस वर्षांपूर्वी पुरोगामी साहित्य संमेलनाच्या गोविंद्यात रांवसाहेव पटवर्धनांना मी पहिल्यांदा पाहिलं. त्यातलं आता काय आठवतं ? फक्त त्यांचं अलौकिक राजबिंडेपण. खादीधारी व्रतस्थ असूनही ते राजा रविवर्म्यांच्या चित्रातल्या मोत्याळ कांतीच्या राजपुत्रासारखे खानदानी दिसत होते. नंतर तीस पावसाळे आले-गेले. नदी-नाले वाहून गेले. तरुण माणसं म्हातारी झाली. म्हातारी माणसं गहाळ झाली. मात्र, ओल्या आभाळात पालवणाऱ्या चंद्रबिंबासारखं डोळे न दिपवणारं, पण सतत पाझरणारं रावसाहेवांचं तरणं राजविंडेपण अंगूळभरही कधी आटलेलं दिसलं नाही. बोलणारा, गाणारा राघू अंग चोरून दूर फांदीवर गप्प गप्प वसून रहावा, तसे ते अलीकडे सतत टतवा; पण अखेर हे गगनविहारी पाखरू आहे, आभाळाचं आणि ह्याचं नातं आहे, ह्याची खूण त्यांच्या अंगाखांद्यावर होती. परवा साहित्य संघातल्या अत्र्यांच्या शोकसभेत वसंत बापटांनी एक फाकडू भाषण ठोकलं. त्याचं ध्वनिमुद्रण ऐकायला म्हणून, त्यांच्याच लाघवी भाषेत सांगायचं म्हणजे ते व्हॅगॅवॅंडींग करीत करीत कौतुकाने आमच्या स्टुडीओत आले. पासष्ठीचा चढा उंवरठा त्यांनी ओलांडलेला असल्यामुळे वार्धक्याच्या पावलांचे अटळ ठसे त्यांच्या देहावर उमटलेले दिसत होते. तथापि त्यांची ऐट, त्यांची आदव, त्यांच्या खेळकर संभाषणाचा गर्भ रेशमी पोत आणि सर्वात मोठ्ठं व अन्यत्र औषधालाही न आढळणारं असं त्यांचं सर्वांशी समान वागणं, हे पाहिल्यावरोवर लक्षात येई की हा कंठा खऱ्या मोत्यांचा आहे. रूपसंपदा वहाल करण्यात देव कमालीचा पंक्तिप्रपंच करतो. काहीजणांना चिंचेच्या पानाएवढं, काही जणांना दुर्वांच्या देठा एवढं, कुणाला कांचनाच्या पाना इतकं, तर कुणाला पिंपळ पाना एवढं रूप तो देतो. काही भाग्यवंतांना तो वदामाच्या तांवूस फत्ताडया पानाएवढं लावण्य देतो. विरागी रावसाहेवांच्या पुढ्यात मात्र त्याने दोन हात लांवरुंद, स्वच्छ, मखमली केळीचं पान मांडून ठेवलं आणि त्याच्या सभोवार धनसंपदेच्या रांगोळीची वेलवुट्टी काढून ठेवली; शिवाय, वाजूला सुसंस्कृतीची समई लावून ठेवायलाही देव विसरला नाही.

**रवींद्र पिंगे**

आयुष्यात मिळवायचं असतं ते सर्व काही मिळवून झालेलं असल्यामुळे आणि संस्कृतीची दैववशात् उपज लाभलेली असल्यामुळे रावसाहेव निर्मत्सरी झाले होते. त्याचाच परिणाम म्हणजे ते सर्वांशी समान वागत, वोलत. पंधरा वर्षांमागे आम्ही 'साधने'च्या छापखान्यात प्रुफांची भेंडोळी समोर घेऊन दुपारचे वसलो होतो. इतक्यात रावसाहेव एका उंच तरण्यावांड देखण्या माणसाला घेऊन हजर झाले. रावसाहेवांच्या आणि त्या माणसाच्या खानदानी रूपापुढे प्रभाकर सिद्ध, श्रीरंग, मी वगैरे मानमोडू माणसं अक्षरशः प्रुफांच्या भेंडोळ्यांसारखेच केविलवाणे दिसलो ! पण रावसाहेवांच्या उमद्या वागणुकीमुळे आमचं गांगारलेपण कुठल्या कुठे झटकून निघालं. हा उपसंपादक, हा प्रूफरीडर, हा घड्याघालू, अशी ओळख करून न देता, "हे वघा माझे सहकारी ! ह्यांच्या करंगळीमुळे गोवर्धन पर्वत उचलला जातोय" अशी सुरवात करून त्यांनी अप्पासाहेब









अनुक्रमणिका

पंतांबरोबर आम्हांला बरोबरीच्या नात्याने गप्पागोष्टी करायला लावल्या. एकदा ते मला त्यांच्या मोटारीतून फिरायला घेऊन गेले. एकदा आर्जवं, आग्रह करुन दादरच्या घरी घेऊन गले. हिरव्याकंच पानांच्या सावल्यातलं ते त्यांचं ऐसपैस घर, ती जागची सुसंस्कृत सजावट, लखलखीत पितळेच्या कोपऱ्यात मांडलेल्या माणसांच्या उंचीच्या समया, लख्ख कलशांची उतरंड, दारात रेखाटलेली बंगाली अल्पना, नक्षीकाम केलेल्या काश्मिरी दांडीचा दिवा, ताजी-ताजी पुस्तकं—अर्धी ह्यात कांदेवाडीतल्या चाळीत काढलेला मी, तो रुबाब पहातच राहिलो ! त्यानंतरच्या आयुष्यात मी मंत्र्यासकट अनेक धेंडांच्या पंक्तीत मटणं चापली. जवळजवळ सर्वत्र पंक्तिप्रपंचच पाहिला. पचवला. वडयांना श्रीखंडपुरी. उरलेल्यांना गारेगार भाजीपुरी, मंत्र्यांना कोंबडी तर काफिल्याला खिमा पाव; धेंडांसाठी इंपोर्टेड व्हिस्की; आम्हाला फेणी. ह्या अनुभवात कानामात्रेचाही फरक झाला नाही. उच्च स्तरात फक्त रावसाहेबांनीच तेवढी समान वागणूक दिली.

## वाचासिद्धीचे आगळे वैभव

पाणी समपातळीत वहावं तसे रावसाहेब वागत. कापायवस्त्रे धारण करण्याच्या अगोदर अनंतराव गद्रेचांचा झुणकाभाकर सत्यनारायण म्हणजे चेष्टेचा विषय झाला होता. पण त्यांच्या एका सत्यनारायणाला हा अखिल भारतीय पातळीवरचा पुरुष खटाववाडीतल्या गोरेगावकरांच्या चाळीत तीर्थप्रसादाला हजर राहून वर व्याख्यान देऊन आला. श्रोत्यांचा शुकशुकाट असलेल्या त्या प्रचंड सभेला लेलेमामा, गळयात कॅमेरा अडकवलेले नटवर्य नाना चापेकर, कंटाळलेलं पूजेचं हरीजन दांपत्य आणि मी, असे मोजून पाच जण वाहव्वा द्यायला हजर होतो. अस्पृश्यता निवारणाचे काम लोकनिंदेची पर्वा न करता अनंतराव वर्षोन् वर्ष एकांडे शिलेदारपणाच्या व्रताने करतात म्हणून त्यांनी अनंतरावांना हातभर सर्टीफिकीट दिले होते. 'साधना' सोडून मंगेश पाडगांवकर वर्ध्याला सेवाग्रामला निघाले, तेव्हा त्यांना निरोपाची पानसुपारी झाली. अठदहा माणसं आम्ही परळमधल्या एका खोलीत बसलो होतो. आंब्याच्या फोडींचा आम्ही फडशा उडवीत होतो आणि रांगत रांगत येऊन मांडीवर विसावलेल्या एका वाळाचं जयवळ कुरवाळीत कुरवाळीत रावसाहेबांचं तलम रेशमी भाषण चाललं होतं. कलावंताचं अवघं जीवन ही एक तपःसाधना असते, जिप्सीसारखा रानोमाळ हिंडत हिंडत, ऊन-वारा खात खात, तो पूर्णत्त्वाच्या मार्गाला लागतो, प्रांतभेद, भाषाभेद, धर्मभेद गाळत गाळत तो विराटाचा अनुभव घेणारा साक्षात्कारी होतो, वगैरे निरुपण त्यांचं चाललंच होतं. दादरच्या 'अमर हिंद' मंडळाच्या जागेत कृष्णमूर्तींचं इंग्रजी प्रवचन होतं. कृष्णजी चार-पाच वाक्ये इंग्रजीत बोलत. रावसाहेब तिथल्या तिथे त्याचा मराठी भावार्थ सांगत, तो किती सरस आणि सोपा असे. वाचासिद्धीचे तसले आगळे वैभव आजवर कुणीही दाखवलेले नाही. 'कृष्णजी हे एक जीवनकवी आहेत' ह्या आरंभाच्या ओळीपासून तर अगदी अखेरच्या समाप्तीपर्यंत, रावसाहेबांच्या वाचेला नुसता बहर आला होता. असे किती प्रसंग सांगावेत ? जयप्रकाशजींनी साधनांच्या शुचितेचा पुरस्कार केल्यानंतरची आणि आचार्य शंकरराव देवांनी संयुक्त महाराष्ट्राच्या हिंसक पर्वाच्या वेळी आत्मशुद्धीप्रीत्यर्थ केलेल्या उपोषणाच्या परिसमाप्तीची सभा, ह्या त्यांच्या पुण्यातल्या कचरेवाडीतल्या 'सीताराम' बंगल्यात झालेल्या दोन्ही खाजगी सभा आज ठळकपणे आठवतात. सुंदराबाई हॉलच्या गच्चीतल्या कृष्णमूर्तींच्या प्रवचनाच्या वेळी कृष्णजींच्या खास विनंतीवरून त्यांनी केलेली तालबद्ध इंग्रजीतील निरुपणे दृष्ट लागावी इतकी गुणमंडित असत. ॲनी बेझंटांबद्दल त्यांना मातृभाव होता. कृष्णमूर्ती जणु त्यांचे निवृत्तिनाथच होते; स्वयंप्रकाशी तसेच दुसऱ्याला प्रकाशायला लावणारे. तोच दीप घेऊन रावसाहेब अखेरपर्यंत दिशा उजळत होते.

अलीकडे एकदा ते रस्त्यात अचानक भेटले. म्हटलं, "रावसाहेब, सध्या काय करता ?" पोटावर नाटकी आविर्भावाने चापटचा मारीत चेष्टेने म्हणाले, "पोटातलं पाणीही हलू न देता, मित्रा, हल्ली गोष्टी सांगतो युक्तीच्या चार !" खरं म्हणजे ते सतत वाचन चिंतनात निमग्न असत. काही चांगलंचुंगलं वाचलं की इतरांकडूनही वाचून घेत. मंगेश पाडगांवकरांकडून त्यांनी स्पेंडरकवीचं "वर्ल्ड वुइदिन् वर्ल्ड" हे



एक-दोन-तीन-चार—खेळ खलास !

आत्मचरित्र वाचवून घेतलं; कृष्णजींचं लिखाण मराठीत भाषांतरीत करून घतलं. "ऑल क्वाएट ऑन दी वेस्टर्न फ्रंट" ही कादंबरी मी वाचलेली नाही असं कळलं तेव्हा गाढ अचंबा व्यक्त करून ते म्हणाले, "ज्या ग्रंथाजवळ धावतं जग क्षणभर थांबलं होतं, तो तू वाचलेलाही नाहीस ! जा, तावडतोब वाच." मालतीबाईंची "वळी" दोन्ही पटवर्धन बंधूंना फार आवडली होती. पार लाग्वरक्वीस्टची कादंबरी त्यांना इतकी आवडली की "पंचविसावा तास" ह्या मथळ्याखाली त्यांनी तिचा साधनेच्या वाचकांना प्रदीर्घ परिचय करून दिला. तसंच जॉर्ज ऑरवेलच्या मृत्यूनंतर त्यांनी त्या लढाऊ लेखकाच्या अंगारमय आयुष्याचा जो परिचय मराठी वाचकांना करून दिला होता, त्याचे विलायतेतही भरघोस कौतुक झाले. "एशियन ड्रामा" ह्या महान राजकीय ग्रंथांचा त्यांनी करून दिलेला परिचय आता ग्रंथरूपानेच प्रसिद्ध होत आहे. वाचकांविषयीच्या पुळक्याने एका पुस्तकाचा इतका चिकित्सक परिचय करून देण्याचं स्वप्न किती लेखक पाहातात ? असा हा विरळा पुळका रावसाहेबांना सर्वांबद्दलच वाटे. पाकिस्तान निर्मितीबद्दलच्या आपल्या ग्रंथाची टिपणं काढण्यासाठी डॉ. आंबेडकरांना निवांतपण हवं होतं. रावसाहेबांनी त्यांना लागलीच नगरला स्वतःच्या वाड्यात नेलं. कृष्णाकाठच्या वाईतला आपला वाडा प्राज्ञपाठशाळेला बहाल करून टाकला. जीव तोडून पिढ्यान् पिढ्या जमवीत आणलेला स्वतःचा अमोल ग्रंथसंग्रह महाविद्यालयाच्या हवाली केला. विठ्ठलवाडीच्या निवांत परिसरात एक बंगला घेऊन तिथे कृष्णमूर्तींचं वास्तव्य घडवून आणलं आणि त्यांच्या सहवासात काही सृजनशील लेखक, कलावंतांना महिनाभर ठेऊन घेतलं. अहो, हे झालं थोरामोठ्यांबद्दलचं; माझ्याबद्दल सांगतो. माझ्या वृद्ध आजींना घेऊन मी तीर्थयात्रेला निघालो, तर ह्या कनवाळू गृहस्थाने मी न मागताच मला दहा पंधरा ओळख पत्रं तिथल्या मातब्बरांसाठी लिहून दिली आणि माझा उल्लेख सतत 'माझे सहकारी' असा गौरवून केला ! ती पत्र डॉ. ग्यानचंद वगैरेंना होती ! त्यांची टाक फारच दाबून लिहिलेली खाजगी पत्रं ज्यांना येत, त्यांना तो एक दिलासाच असे. मला तो अनेकवार लाभला.

### मन पिळवटणारे लेखन

नव्या पिढीवर संस्कार कोरणारा शिक्षक आणि शिक्षण ह्याविषयी ते सदैव जागरूक असत. तरुण विद्यार्थी काय वाचतात ते ते जाणून घेत. त्यानिमित्ताने त्यांच्याबरोबर मी एलफिन्स्टन महाविद्यालयाचे माजी ग्रंथपाल श्री. आठल्ये ह्यांच्या विन्हाडी गेलो होतो. दोन-तीन सलग पिढ्यांशी साक्षात् संबंध येतो हे शिक्षकांचं एका परीने भाग्यच असतं, असं ते आठल्यांपाशी बोलले होते. मी शिक्षक आईबापांचा चिरंजीव. तेव्हा माझ्या घरीही ते अगदी प्रेमळपणाने आले. मात्र कधी कधी ते भलतेच विथरत. एकदा सेवादलाच्या बौद्धिकाला आम्ही त्यांना आणलं. हातापायाच्या घड्या घालून, तोंड उघडी टाकून पोरं माळा करून बसली होती. रावसाहेब त्यांच्या घशात ज्ञानामृत ओतणार होते. सलामीलाच त्यांनी प्रश्न केला, "मुलांनो, दादाभाई नवरोजी कोण होते ?" रामा, शिवा, गोविंदा ! एक जण उत्तर देईल तर हराम ! रावसाहेबांचा एकदम तोल सुटला. म्हणाले, "ज्याने स्वराज्याची कल्पना देशाला दिली, त्याच्याविषयी हे अज्ञान ! मग मी तरी कशासाठी बोलू ?" आणि चकार शब्द न उच्चारता चक्क निघून गेले ! वाचकांवर संस्कार कोरील असं त्यांचं संपन्न जीवन होतं. त्यांचं आत्मचरित्र मोठं मनोहारी झालं असतं; पण जिभेवर सरस्वती असलेला हा सुपुत्र लेखणीला नमनालाच शरण जाई. लेखनाचे त्यांना अनंत कष्ट होत. एकेका लेखाची सुरवातीची पानं दहा-दहा वेळा फाडून टाकीत आणि पुन्हा अकराव्या वेळी त्याच लेखाची नव्याने सुरवात करीत ! मात्र जे लुटीत लिहीत ते बाळबोध, रसाळ आणि पारदर्शक असे. परवा सेनापती बापटांनी सीमा प्रश्नावर आत्मनाश जाहीर केल्यावर त्यांनी पूज्य सेनापतींना लिहिलेले अनावृत पत्र म्हणजे त्यांच्या मनाचा स्वच्छ आरसाच होता. त्यांच्या अवघ्या व्यक्तिमत्वाला व्यापून राहिलेली शुचिता त्यांच्या ओळीओळीतून फुलली होती. साधु पुरुषसुद्धा लोकशाहीच्या शाश्वत मूल्यांबद्दल विवेक बाळगत नाही म्हणून त्यांना झालेली हृदयव्यथा मन पिळवटणारी होती. अशा अनेक व्यथा हा जीव सोशीत होता.

व्यथित चित्ताला विरंगुळा लाभावा, सत्संग घडावा, म्हणून त्यांनी भूदानयात्रेत शतपावल्या घातल्या. पण तिथेही ते पुरेसे रमले नाहीत. एकदा चर्चगेट स्टेशनात भेटले. म्हणाले, "मित्रा, अखेर चिरवांच्छित असा तो मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र पदरात पडला ! आता तरी तुम्ही मंडळी कुशल ना ?" आमची दारुण निराशा



'मोरारजी'चा प्रश्न अजून 'उभा' आहे ! –निजलिंगप्पा


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मी सांगितली. तेव्हा ते विषण्ण हसले ! एकदा भटकताना म्हणाले, "आपल्या दुःखाचा उगम विचार करण्याच्या चुकीच्या पद्धतीत आहे. आपण दुसऱ्यासाठी म्हणून सत्कृत्य करतो आणि मग अलिप्त न होता उपकारांची नोंद मनाच्या खतावणीत करतो. साहजिकच नफ्यातोट्याचं गणित सुरू होतं. ही खतावणी न उघडता सहज-पणे प्रकाश फुलवीत गेलं पाहिजे. एकदा म्हणाले, "अरे, आनंद किती साध्या साध्या गोष्टीत असतो ! आपण दिवसभर धावत सुटतो, पण पाखरांसाठी वाटोभर पाणी कुंडीत ठेवतो काय ? आपल्या बागेत पाखरं यावीत, त्यांना आपल्याजवळ अभय असावं, असं कधी आपल्याला वाटतं काय ?" निर्भेळ आनंदाच्या निरपेक्ष मकाणांचा पत्ता जन्मभर धावत राहूनसुद्धा माणसाला मिळत नाही ह्याची रावसाहे-बांच्या जीवाला खंत होती. सांप्रतच्या जुगारी राजकारणाचा तर त्यांना परा-कोटीचा किळस आला होता. राजरोस काळाबाजार करणारा गब्रू समाजद्रोही जनतेच्याच पाठींब्यावर निवडून येतो, राजकारण खेळवतो आणि फाशीच्या वधस्तंभाला पुण्यस्पर्श दहादा करून आलेल्या शिरुभाऊंसारख्या प्रखर देश-भक्ताचं डिपॉझिट गुल् होण्यापर्यंत मजल जाते, ह्या आपल्या स्वतंत्र भारतातल्या अलौकिक चमत्कारापुढे त्यांनी कोपरा-पासून हात जोडले. तशात हृदयविकाराच्या दोन झटक्यांनी त्यांचा देहही पोखरलेला होता. तरीसुद्धा ते वरपांगी हसत होते, खेळत होते, व्हॅगॅबाँडींग करीतच होते. सचिवालयातल्या बोरूकामाशी काडीमोड घेऊन मी आकाशवाणीबरोबर पाट लाव-ल्याचं त्यांना दोन ओळीचं पत्र लिहून कळवलं नाही म्हणून त्यांनी माझे आपले-पणाने कान उपटले. अशा सोयरीकी पालटून काही श्रेय मिळत नाही हे त्यांनी मला खुबीने जाणवून दिलंच. सर्वांच्या सुख-दुःखाशी समरस होत होत, फुंकर घालीत घालीत, त्यांची अशी मुशाफिरी चाल-लेलीच होती. धाकटा भाऊ अच्युत तर केवळ त्यांचा प्राणच होता. प्रपंचपाशात कधीच अडकून न राहिलेल्या रावसाहे-बांचा बागेतल्या फुला-पानांवर जीव होता. ह्या सर्व विश्वाला त्यांनी परवा अचानक गुंगाराच दिला.

जेव्हा एक पोशिंदा जातो, तेव्हा एक संसार उघडा पडतो. एक अंमलदार गच-कला, तर त्याच्या खुर्चीत दुसरा भिडू विराजमान होतो; ह्या कानाचं त्या कानाला कळत नाही. नाटकवाला मेला तर नाटकमंडळी बेवारशी होते; नट ढगां-सारखे इतस्ततः वाहातात. पुढारी मेला तर राष्ट्र पोरकं झालं असं नुसतं म्हणतात. लेखक-कवी हरपला तर पंचक्रोशीतल्या शाळांना सुट्टी मिळते; पोरं खूष होतात. तात्पर्य, पान गळून पडलं तर फारसं काहीच घडत नाही. मात्र रावसाहेबांसारखा पराई पीड जाणणारा मृदु पुण्यात्मा अनंतात विलीन होतो, तेव्हा संस्कृती एका अभि-जात रेशमी अंगाला मुकते; म्हणजेच आपल्या डोळ्यांसमोर एक खिन्न चंद्रास्त होतो !

आता दिवा कोण लावणार ? कधी लावणार ?

• • •

## आम्हीही 'चंद्रा'वर पोहोचलो !

पंचवीस वर्षांची सेवा समर्पण म्हणजे जणु 'चंद्रा'वर पदार्पण




रजतमहोत्सवी

डौलदार

दिवाळी अंक

१९६९

सप्तरंगांची मुक्त उधळण करणारे मुखपृष्ठ आणि ८ रंगीन चित्रकलाकृति ● श्री. जयवंत दळवी आणि श्री. अच्युत बर्वे यांच्या दोन प्रक्षोभक कादंबऱ्या ● १६ पानांची दुरंगी बिंग-चित्रमाला ● स्पर्धेतून निवडलेले विनोदी साहित्य ● श्रेष्ठ लेखकांच्या मोजक्या पण दर्जेदार कथा ● जीवनस्पर्शी विषयावरचे निवडक लेख ● पानोपानी विखुरलेली उदर-विदारक हास्यचित्रे

| मूल्य ४ रु. |
| --- |
| + १ रु. र. पो. |
| पृष्ठ २२५ वर |

दलाल आर्ट स्टुडिओ

४२ केनेडी ब्रिज, मुंबई-४

एजंटांनी आपली मागणी दिनांक २६ सप्टेंबरपूर्वी नोंदवावी.



अनुक्रमणिका



# साह

**—शशिकांत कोनकर**

साहेबाने प्रथम त्याला नांव विचारून घेतले व त्याला तिच्यापुढे उभे करीत साहेब म्हणाला, 'हे श्री. देशपांडे.'

देशपांडेने तिला नमस्कार केला.

'आपलं नाव ?' त्यानेच तिला साहेबाच्या देखत विचारले. तिने त्याच्याकडे सहजपणे बघितले. त्याला पाहिल्यावर तिच्या कपाळावर एक सूक्ष्मशी आढी उमटली, इतकी सूक्ष्म की ती फक्त तिलाच लक्षात आली. निदान तिला तरी तसे वाटले. परंतु लगेच स्वतःला सावरीत गोड हसून ती म्हणाली, 'माझं आडनांव तासकर.'

'अस्सं !' तो मान हलवून म्हणाला.

साहेबाने त्याच्या खांद्यावर हात ठेवला व तो तासकरांना म्हणाला, 'हे आजपासून नवीनच आपल्या सेक्शनमध्ये आले आहेत. यांना help करा.' व नंतर देशपांडेला तो म्हणाला, 'तुम्ही यांच्या-कडून काम समजावून घ्या.'

'यस् सर !' देशपांडे म्हणाला.

'शिवाय काही अडलं तर मला विचारा.'

'यस् सर !'

साहेब आपल्या टेबलापाशी गेला. देशपांडे मात्र उभा राहून तासकरकडे व तिच्या कामाकडे बारीक नजरेने पाहू लागला. ती उजव्या हाताने काही पेपर्सवर स्टँप मारत होती. स्टँप मारल्यावर तिच्या हातातल्या काचेच्या बांगड्या ओघळत व त्यांचा किण-किणाट स्टँपच्या आवाजात मिसळून जाई. देशपांडेची या तिच्या हालचालींकडे बघता बघता तंद्री लागली. त्याक्षणीच तिने त्याच्या-कडे पाहिले. तो गोंधळला. थोडासा ओशाळलासुद्धा. परंतु तो काही बोलायच्या आत तिने फर्रकन् आपल्या डाव्या हातालगतची खुर्ची आपल्या बाजूला सरकवली व ती म्हणाली, 'बसा'.

देशपांडे बसला तेवढ्यात तिने त्याच्याकडे पाहून घेतले. तो गोरा होता तरीही गबाळा वाटत होता. त्याच्या चेहऱ्यावरला बावळटपणा पुसू म्हटले तरी पुसता येण्यासारखा नव्हता. त्याला स्वतःला त्याची जाणीवही नसावी. तिच्या शेजारी कारकून म्हणून काम करण्यास कबूल होणे हाही त्याच्या बावळटपणाचा भाग होता. त्याच्यापूर्वीच्या दोन तीन कारकुनांना तिने खेळवले होते. त्यांना नखे दाखवली होती. व स्वतःची छोटी छोटी कामेही त्यांच्याकडून करून घेतली होती. वेळ पाहून स्वतःचा स्वार्थही अचूक साधला होता. त्यातल्या गोगटेला तर तिने तिच्यासाठी 'मॅड' केले होते. गोगटेचे नाव मनात येताच तिला हसू आले. त्याची थोडी कीवही वाटली.

गोगटे दिसायलासुद्धा रुबाबदार होता. दीड–दोन महिनेच तो तिच्या शेजारच्या जागेवर टिकला. त्या अवधीत त्याने तिच्यावर प्रेमसुद्धा केले. तिने मात्र त्याची केविलवाणी परिस्थिती करून टाकली. गोगटेपुढे देशपांडे म्हणजे पाचोळा होता.

'मी काय काम करू ? मला सांगा ' देशपांडे ती स्टँप मारत असताना तिला विचारत होता.

'तुम्ही जरा वेळ बसा. मी सांगते.'

तो बराच वेळ नुसता बसून राहिला. अधूनमधून तो नखे कुरतडत होता. एवढेच काम तो करीत होता. जरा वेळाने त्याला नुसते बसण्याचा कंटाळा आला. तो तिला म्हणाला, 'मी जरा जाऊन येतो.'

'हं !' ती कामातून मान वर न करता म्हणाली.

'पाच–दहा मिनिटात येतो.' असे आश्वासन देऊन तो गेला.

तो गेल्यावर एक दोन मिनिटातच ती साहेबासमोर गेली व हातातले पेपर्स त्याच्या समोर धरत तिने विचारले. 'सर, याचा reference नंबर काय लिहिलाय ?'

साहेबाने ते कागद घेतले व त्यावरला नंबर निरखून पाहिला. त्यालाही तो नीट लागेना. तेव्हा कागद उलटे सुलटे करीत तो म्हणाला, 'अहो, हे काम तुम्ही कशाला करताहात ?' ती काहीच बोलली नाही. तिने खाली मान घातली.

'हे काम त्या नवीन clerk ला द्या'

तिने एकदा देशपांडेच्या जागेवर आपली नजर फिरवली. व ती पुन्हा खाली मान घालून तिथेच स्तब्ध उभी राहिली. साहेबाचीही नजर देशपांडेच्या खुर्चीकडे गेली. देशपांडे तिथे जागेवर नव्हता.

'हे काय ? ते कुठे गले ?' साहेबाने तिला विचारले.

बस. तिचे काम झाले होते. तिने तिला जे करायचे त्याची सुरवात तर मोठी नेटकी केली होती.

'कुठे गेले ? काम टाकून कुठे गेले ?' साहेब तिला विचारत होता.

'माहीत नाही.' ती पुटपुटली. 'पण येतील ते थोडया वेळात !'

'आणि त्यांचं काम कोण तुम्ही करताहात ?'

'आल्यावर ते करतीलच' ती देशपांडेचा बचाव करण्याचा आपला आटापिटा साहेबाला मुद्दाम दर्शवू लागली.

'कमाल करता तुम्ही तासकर ! अहो, नवीन माणसाला आल्यावरोबर इतकं ढिलं सोडून कसं चालेल ? मग माणूस मागून त्याचा उपयोग काय ? आल्यापासून काय काम केलं त्यांनी ?'

ती अडखळली. 'नाही म्हणजे तसं तसं थोडं केलं.'

'उगीच बाजू घेवून बोलू नका. Frankly सांगा.'

आपण देशपांडेची बाजू घेतो आहोत असे साहेबाला वाटल्यामुळे ती सुखावली. व मग एकदम स्पष्टपणे सत्य बोलावे तसे ती म्हणाली, 'आत्तापर्यंत ते नुसते बसून होते.'

'. . . आणि तुम्ही त्यांना तसं बसू दिलंत ?'

'मी काय करणार ? मी माझं काम करत होते.'

'अले की त्यांना सांगा 'मी बोलवलंय' म्हणून !'

तिने नाराजीने साहेबाकडे पाह्यले व सावकाश पावले टाकीत ती आपल्या जागेवर जाऊन बसली.

थोडया वेळाने देशपांडे येऊन आपल्या खुर्चीवर घाईघाईने बसला. ती कामात गढली होती. तिला तो हलक्या आवाजात म्हणाला, 'साहेबाने विचारलं नाही ना काही ?'

तरीही ती कामातच गढली होती. काम करता करता तिने 'अं ! ' एवढाच उद्‌गार काढला. नंतर खाली मान घालून लिहीतच ती त्याला म्हणाली, 'साहेब तुम्हाला बोलावताहेत !'

'मला ?' त्याने घाबरून विचारले.

'हो.'

'कशाला ?'

'कुणास ठाऊक.' ती म्हणाली.

'मी नव्हतो तर काही विचारत होते ?'

'हो.'

'काय ?'

**" पहा ना या तासकर काय म्हणताहेत.... मी काम एकटयानं केलं तर म्हणताहेत की मी त्यांचा या सेक्शनमधला आराम घालवला "**

'तुम्ही किती काम केलं !'

'तुम्ही काय सांगितलंत ?'

'थोडं फार काम केलं म्हणून सांगितलं.'

'मी काय सांगू ?'

'कामच करत होतो म्हणून सांगा.'

'काय केलं ते दाखवायला सांगितलं तर ?'

'पंचाईत आहे.' पेन दातानी चावत ती म्हणाली.

'मी काम समजावून घेत होतो असं सांगू ?'

तो आता गोरामोरा झाला होता. आपण उगीच बाहेर गेलो आणि बसून राह्यलो असे त्याला वाटले. ती म्हणाली, 'प्रथम तुम्ही साहेबाकडे जाऊन तर या.'

तो अनिच्छेने उठला. तिला त्याचा त्या क्षणाचा मानसिक ताण समजत होता. तटस्थतेने एखाद्या किडयाचे अवलोकन करावे तशी ती त्याच्या हालचालींकडे पहात होती.

पण अर्धवट उठलेला तो खाली बसला आणि म्हणाला 'पुन्हा विचारलं तर जाईन. एखादेवेळी साहेबाच्या लक्षातही येणार नाही.'

हे मात्र तिला आवडले नाही. याला अगोदरच्या इथे असलेल्या कारकुनांनी साहेबाची बोलणी खाल्ली होती. गोगटेचे तर कामाकडे लक्षच नसे. तो नेहमी कामात चुका करून ठेवीत असे. तिच्याशी बोलायला त्याचे ओठ नुसते आसुसलेले असत. यामुळे तो बेरजा चुके, टक्केवारी काढायला चुके. ती फक्त त्याला विचारी, 'गोगटे, बरोबर केलंय ना सगळं ?'

'हो, हो.' तो उत्साहाने तिच्याकडे पहात म्हणे. मग ती ते सर्व साहेबाच्या टेबलावर नेऊन ठेवी. आणि थोडयाच वेळात गोगटेला साहेबाकडून बोलावणे येई.

गोगटे साहेबाकडून परत आल्यावर कधी त्याचे तोंड उतरलेले असे. कधी त्याच्या चेहऱ्यावर गोंधळ आणि संताप याचे चमत्कारिक मिश्रण दिसे. काही वेळा तो साहेबाला शिव्या देई. तेही साहेबाच्या कानावर जाई.

या सर्वातून तिने त्या सेक्शनमध्ये तिचे असे खास स्थान निर्माण केले होते. नवीन येणाऱ्या प्रत्येक कारकुनाभोवती ती असे जाळे निर्माण करीत असे की त्यात तो गुंतून जावा. तो अकार्यक्षम ठरावा. कामचुकार ठरावा.

याचे पारितोषिक म्हणून तिला गेल्या जूनमध्येच दोन increments एकदम मिळाली होती. तिचा उरक दांडगा होता. प्रत्यक्ष साहेबानेही तिची तिच्याजवळ स्तुती केली होती. असे असताना तिच्या सेक्शनमध्ये आजच आलेला हा देशपांडे मात्र तिने सांगितल्यावरही साहेबाकडे जायला तयार नव्हता.

ती त्याला म्हणाली, 'नसेल जायचं तर नका जाऊ ! परंतु या साहेबांच्या चांगलं लक्षात रहातं. मागाहून त्यांच्या लक्षात आल्यावर मात्र त्यांचं तुमच्याबद्दल भलतंच खराब Impression होईल.'

तो शब्दही बोलला नाही. त्याने चेहऱ्याची विचित्र चाळवा-चाळव केली. तिने त्याच्या चेहऱ्यावरचे ते भाव पाहिले. परंतु त्याच्या मनाचा तिला थांग लागेना. त्याच्या बावळट चेहऱ्याकडे फारसे पहाण्यासारखे असे काही नव्हतेच. तो मनातून मात्र खूप अस्वस्थ झाला होता एवढे तिच्या लक्षात आले.

त्यानंतर दोन तीन दिवस सगळे सुरळीत चालले. त्या दोन तीन दिवसात तिची त्याच्यावर सक्त नजर होती. तो कामात कुचराई करत नव्हता. साहेबाचा त्याला धाक वाटत होता. तिच्या-बद्दलही त्याच्या मनात अबोल भय घर करू राहिले होते. तिने त्याला 'देशपांडे' अशी हाक मारली की त्याच्या बावळट चेहऱ्यावर 'भेदरटपणा' दिसे. 'देशपांडे ती तेवढी 'व्हाऊचर्स' लिहून टाका' असे तिने सांगितले की तो मान हलवी. निमुटपणे ते काम करून टाकी. त्याची कामात सहसा चूक होत नसे. त्याचे अक्षरही वळणदार होते. ती एकदोनदा साहेबाकडे त्याचे काम घेऊन गेली असता साहेबाने 'समाधान' व्यक्त केले होते. अक्षर सुरेख असल्याचेही बोलून दाखवले होते. अर्थात् तिने हे त्याला सांगितले नव्हते. ती फक्त कुठले तरी खुसपट मिळण्याची वाट पहात होती. साहेबाने त्याच्याबद्दल समाधान व्यक्त करावे हे तिला फार खुपले होते.

आणि तशी संधी तिच्याकडे आपणहून चालत आली. गेले काही दिवस ती त्याचाच विचार करत होती. देशपांडेने तिला शब्द बोलायलाही जागा ठेवली नव्हती. असे असताना एक दिवस देशपांडेला ऑफीसात यायला चांगलाच उशीर झाला. तो धावत धापा टाकत आपल्या जागेवर येऊन बसला. तो दमला होता. त्याच्याकडे पाहून ती ठेवणीतले हसली. नाईलाजाने त्याच्याही चेहऱ्यावरून हास्य ओघळले.

'आज तुम्हाला बराच उशीर झाला देशपांडे !' तिने विचारले.

'एक गाडी चुकली.'

'साहेब विचारत होते अजून कां आले नाहीत म्हणून !'

'मग ?'

'मग काय ? त्यांना सांगा आल्याचं !'

'तुम्ही सांगा की.'

'मी ? मी कशाला ?'

तिला वाटले की हा आता म्हणेल 'नाही तरी तुम्ही सांगताच सगळं साहेबाला !' परंतु तो तसे काही म्हणाला नाही. फक्त इतकेच म्हणाला, 'मी नवीन आहे. तुमची ओळख आहे त्यांच्याशी !'

तिला त्याची थोडीशी दया आली. परंतु तितक्यापुरतीच. तो 'लेट' आला हे साहेबाच्या कानावर जाणे आवश्यक होते. तिने थोडा वेळ विचार केला. मनाशी जुळवाजुळव केली आणि दोन फायली घेऊन ती साहेबाकडे निघाली.

'कुठे चाललात ?' त्याने पहिल्यांदाच तिला इतक्या धीटपणे विचारले.

'साहेबाकडे.'

'मी लेट आलो हे सांगायला चालला असाल तर फायली इथेच ठेवा.'

ती चमकली. तो हे वाक्य भाबडेपणाने बोलला की टोचून बोलला याचा निर्णय तिला घेता येईना.

'या फायली साहेबाला हव्या आहेत.' ती तुटकपणे म्हणाली.

'शिपाई नेईल की. तुम्ही बसा. शिपायाची कामं तुम्ही कशाला करता ?'

'काम नसलं की चैन नाही पडत मला ! आणि दुसऱ्यांसारखं बसून राहायला तर मला मुळीच आवडत नाही.' तिने फणकारून टोमणा मारला.

'फायलीत पुस्तक घालून वाचत बसा की नेहमीसारखं.' तिला वाटले त्याने तिच्या टोमण्याची सव्याज परतफेड केली. तरी त्याचा चेहरा मात्र भाबडा दिसत होता. 'तुम्ही वाचत बसा. काही काम नसलं तर खरोखर वाचत बसा. शिपाई नेईल त्या फायली.' तो आस्थे-वाईकपणे तिला म्हणत होता.

ही आस्था खरी होती की त्यात उपरोध होता हे तिला कळेना. ती मटकन् खुर्चीवर बसली. काय करावे ते तिला सुचेना. तो पुन्हा त्याचे काम करू लागला. मध्येच एकदा नजर वर करून त्याने तिच्याकडे पाहिले. फायलींकडे पाहिले आणि सेक्शनच्या शिपायाला खुणेने जवळ बोलावून तो म्हणाला, 'या फायली नेऊन साहेबाच्या टेबलावर ठेव.' परंतु तीच घाईघाईने म्हणाली 'नको नको. आणि तिने त्या फायलींवर आपले हात ठेवून डोके टेकले.

तिला काम सुचेना. हा माणूस गोगटेपेक्षा वेगळा होता. याला वेगळ्या प्रकारे शह द्यायला हवा होता. गोगटेला तिने प्रेमाचे नाटक करून होता नव्हता करून टाकला. साहेबाला गोड हसून ओठांचा चंबू करून व काही वेळा आपण फार भोळ्या आहोत असे दर्शवून आपल्या कह्यात ठेवला होता. तिच्यावर साहेबाने पूर्ण विश्वास टाकला होता. याला कसा नामोहरम करावा याबद्दल ती विचार करीत होती.

थोड्या वेळाने ती त्याला म्हणाली, 'आज मी लवकर जाणार आहे !'

'जा की !' तो म्हणाला. तिला वाटले तो 'कशाला ?' असे विचारील. परंतु तिने त्या प्रश्नाची वाट पाहूनही त्याने काही विचा-रले नाही. तेव्हा ती आपणहूनच म्हणाली, 'माझं आज डोकं दुखतंय !'

'फार दुखतंय का ?'

'हो.' ती म्हणाली. तो काही बोलला नाही.

'आज दुपारनंतर माझं काम तुम्हाला करावं लागेल.' ती म्हणाली. व तो काय म्हणतो याची वाट पाहू लागली.

'करीन की!' तो तत्परतेने म्हणाला. इतक्या तत्परतेने गोगटेच 'हो' म्हणायचा.

त्या दिवशी ती साहेबाला विचारून लवकर गेली. आणि नंतर लागोपाठ चार दिवस ती आलीच नाही.

ह्या चार दिवसात एक महत्त्वाचे Statement जायला हवे होते ते जाताना तिने तसेच अपुरे ठेवले होते. काही महत्त्वपूर्ण केसेस् Pending ठेवल्या होत्या. वास्तविक ज्या दिवशी ती लवकर गेली त्याच्या दुसऱ्या दिवशी ती येणार होती. परंतु ती लवकर गेली त्या रात्री तिला ताप भरला. त्यामुळे तिचा नाईलाज झाला. तिच्या गैरहजेरीत देशपांडेने सगळा घोळ केला असणार हे तिला समजत होते. ते सगळे तिलाच निस्तरावे लागणार होते. साहेबाला ती हे सगळे सांगणार होती. या चार दिवसात देशपांडेची काय विकट अवस्था झाली असेल याचा विचार करताना तिला हसू फुटले.

ती कामावर आली तेव्हा देशपांडे खाली मान घालून काही पेपर्स चाळत होता. 'म्हणजे आज हा लवकर आला होता तर!' तिच्या मनात येऊन गेले. तिनं पर्स टेबलावर जरा जोराने ठवली. न बोलता देशपांडेचे तिच्याकडे लक्ष गेले तर तिला हवे होते. परंतु त्याने तिच्याकडे ढुंकूनही बघितले नाही. तो हेतूपुरस्सर तिच्याकडे बघत नव्हता असे तिला वाटले. शेवटी तिनेच विचारले 'काय देशपांडे?'

'अं! तुम्ही?' तो मान वर करत म्हणाला. नंतर म्हणाला, 'गेले तीन चार दिवस कुठे होतात?'

'तब्येत बरी नव्हती.' तिने उत्तर दिले.

'तुम्ही नव्हतात. पण इथे सगळा घोटाळा झालाय!' असे किंवा अशा तऱ्हेचे वाक्य ऐकण्याची तिने देशपांडेकडून अपेक्षा केली. परंतु तो शब्दही बोलला नाही. त्याच्या चेहऱ्यावरूनही तिच्या गैरहजेरीत काय झाले ते कळायला मार्ग नव्हता. तिची उत्कंठा शिगोशिग वाढली. तिला वाटले साहेबाकडे जावे व आपण आलो आहोत हे त्याला दिसावे. तिने पर्स टेबलावर ठेवली व ती साहेबाकडे जायला निघाली. इतक्यात शिपायानेच तिला साहेब बोलवताहेत म्हणून येऊन सांगितले. तिने हसत हसतच साहेबाच्या खोलीत प्रवेश केला. 'बसा.' साहेब हातातल्या कागदातून मान वर न करता म्हणाला. त्यातील तुटकपणा तिला जाणवला. साहेबाला खूष करण्यासाठी ती स्वतः घाईघाईने म्हणाली 'मी नसल्यामुळे देशपांडयांनी बऱ्याच चुका करून ठेवल्या असतील. शिवाय महत्त्वाच्या केसेस आणि स्टेटमेंटही तसंच राहिलं असेल. आजच मी ते पुरं करून देते.'

साहेबाने न बोलता तिच्याकडे नुसते बघितले. तिला त्यांच्या डोळ्यातला अर्थ कळला नाही; परंतु ती ज्या घाईने आपणहून बोलली त्यापेक्षा कितीतरी घाईने गप्प झाली.





अनुक्रमणिका

'हे पहा मिस् तासकर देशपांड्यांनी सर्व काम व्यवस्थितपणे पुरं केलं आहे. तुमच्यापेक्षा फार व्यवस्थित व वेगाने काम करतात ते. Monthly Statement कालच पाठवलं.'

तिच्या चेहऱ्यावरचे भाव पालटले. साहेब बोलल्याविषयीचा अपमान, देशपांडेबद्दलचा राग यामुळे तिचा चेहरा साफ पडला होता. तरीही चेहरा पडल्यावर हसावे तसे हसून ती म्हणाली, 'देशपांडे is a good hand.'

'ते उघडच आहे.' साहेब तिच्यावर नजर रोखत म्हणाले.

'त्यांच्यामुळेच मला कळलं की इथे दुसरा माणूस देण्याची आवश्यकता नाही.'

'पण काही वेळा मात्र काम जास्त येतं!' ती उगीचच लाघवीपणाने साहेबाला म्हणाली, 'त्यावेळी मात्र मदतीची आवश्यकता वाटते.'

'छे हो. तुम्ही फार slow आहात. एक नवा मनुष्य जे काम पुरं करून लवकरं जाऊ शकतो ते तुम्हाला करता येत नाही.' साहेब तुसडेपणाने म्हणाला. 'तुम्ही काय करता दिवसभर?'

'काही केसेस् Complicated असतात.' ती मानभावीपणाने म्हणाली.

'बरं, जा. जागेवर जाऊन बसा.' साहेब तट्कन् तोडत म्हणाला. हे शेवटचे शब्द तिला फार लागले. आतल्या आत तिचे रक्त जळून गेले. ती एका चमत्कारिक हटवादीपणे तिथे तशीच उभी राहिली. साहेबाने तिच्याकडे ढुंकूनही पाहिले नाही. अपमानाने तिला रडू येईल असे वाटले. झटकन् ती फिरली आणि साहेबाच्या खोलीतून बाहेर जायला निघाली. जाता जाता साहेब तिला म्हणाला,'... आणि हे पहा तासकर यापुढे तुम्हाला मदतनीस मिळणार नाही.'

साहेबाच्या खोलीतून ती जी निघाली ती थेट देशपांडेपुढे जाऊन उभी राहिली. तिचा आजपर्यंत असा उपमर्द कुणीच केला नव्हता. साहेबाच्या त्या बोलण्याने ती जळफळत होती... तिच्या मनाचा तोल ढळला होता. मन थाऱ्यावर नव्हते. त्यातच देशपांडेने आल्यावरोबर विचारले 'काय म्हणत होते साहेब?'

तिला वाटले देशपांडे हा प्रश्न मुद्दामच कुत्सितपणे विचारतो आहे. त्यामुळे तिचा मनावरचा उरलासुरला तावासुद्धा गेला आणि चिडीने तिने विचारले, 'त्या दिवशी तुम्ही सर्व काम एकट्याने केलंत?'

साहेब जे तिला बोलला त्याचे सव्याज उट्टे ती देशपांडेवर काढणार होती.

'हो.' देशपांडे म्हणाला.

'पण ते काम दोन माणसांचं होतं.'

यावर देशपांडेने नुसत्या भुवया उडवल्या.

'तुम्ही एक माणूस मागून घ्यायचात. तुम्ही आपला आराम घालवलात.'

देशपांडेला काहीतरी निरुत्तर करणारे बोलावे असे तिला वाटत होते. परंतु अजूनपर्यंत सगळेच फसत होते. देशपांडेला कात्रीत पकडण्यासाठी ती संभाषणाचा धागा पुढे नेत होती.

'इथे इतकी वर्षं नोकरी करून तुम्ही कोरडेच राहिलात. तुम्ही माणूस मागून घ्यायला हवा होतात.'

आता देशपांडे चिडीला आला. त्याचा स्वर चढला. व तो म्हणाला, 'आवश्यकता नव्हती तरी मागून घ्यायचा?'

'हो तरी.' ती हेकटपणे म्हणाली.

'कमाल आहे!' त्याने आवाज खूप मोठा केला.

'कमाल आहे तुमची!' आता त्याने उघड उघड तिच्या विरुद्ध पवित्रा घेतला होता.

त्याने हे वाक्य इतक्या मोठ्यांदा उच्चारले की केबिनमधून बाहेर पडणाऱ्या साहेबाचेही तिकडे लक्ष गेले.

'काय झालं हो देशपांडे?'

'पहा ना या तासकर काय म्हणताहेत?'

'काय म्हणताहेत?'

ती वरमली. तिची अवस्था विकट झाली. चार सहा क्षण तिला तशाच अवस्थेचा ताण सहन करायला लावून तो म्हणाला, 'सर्वच्या सर्व काम मी मदतीशिवाय केलं ते कुठेच गेलं आणि वर या तासकर म्हणताहेत...'

'काय?'

तिला काय करावे ते कळेना. मोठ्या मुष्किलीने ती तिथे उभी राहिली. देशपांडे धूर्त आहे की मूर्ख आहे ते तिला कळेना.

'मला शिकवताहेत.' देशपांडेने साहेबाला सांगितले. 'ऑफीसात कादंबऱ्या वाचायच्या असतात. म्हणून तासकरांना मदतीला माणूस लागतो. मी काम एकट्यानं केलं तर म्हणतात तुम्ही इथला आराम घालवलात माझा!'

दोन वाक्यात देशपांडेने तिच्यावर सपासप दोन वार केले. तिला घायाळ करून टाकले. निपचित करून टाकले. साहेब केव्हा निघून गेला हेही तिला कळलं नाही. ती विचार करू लागली. आता या डिपार्टमेंटला रहाण्यात काही अर्थ नव्हता. देशपांडेने तिचे वर्चस्व चेचून काढले होते. तिने एक दोन दिवसात बदलीचा अर्ज करण्याचे ठरविले. त्या विचारानेच तिला भोवळ आली. बदली केल्यावर कुठे फेकतील याचा नेम नव्हता. इथे तिचे बस्तान चांगले बसले होते. यातून स्वत:ची कशी सुटका करून घ्यावी ते तिला समजेना. इतक्यात साहेबाच्या खोलीतून शिपाई बाहेर आला व त्याने तिच्याजवळ येऊन एक टंकलिखित पत्र दिले. तिने ते वाचले. ती तिच्या बदलीची ऑर्डर होती. बदलीच्या पत्राकडे पाहून तिला हायसे वाटले व त्याचवेळी तिच्या पोटात विलक्षण कालवाकालवही झाली. ते पत्र घेऊन तशीच ती साहेबाच्या केबिनकडे निघाली. साहेबाची सही व परवानगी घेऊन ती बाहेर आली तेव्हा तिचा त्या सेक्शनशी संबंध तुटला होता. तिला ते कागद, तो देशपांडे, त्या सेक्शनचा शिपाई व तिथल्या फाईली सारेच परके वाटत होते.

— ● ● ●

—अनंत फंदी

# शा हि री



# आणि पूर्वगामी अपभ्रंश भाषा-वाङ्मय

"......हळुहळू स्तनयुगुळ इतके उत्तुंग होत जाते की त्यामुळे नायिका चिंतित होते...कारण त्यामुळे तिच्या प्रियकराचे मुख तिच्या मुखापर्यंत पोहोचणे अशक्य होते...म्हणून ती आपल्या वक्षस्थळावरच रागावते..."

## अपभ्रंश भाषेचा इतिहास

अपभ्रंश या शब्दाचा सर्वसाधारण अर्थ स्पष्ट आहे. अपभ्रंश म्हणजे भ्रष्ट, स्खलित, च्युत, विकृत अथवा अशुद्ध. प्रत्येक प्राकृत भाषा बदलत जाऊन तिचे अपभ्रंश रूप निर्माण झाले, आणि अशा रीतीने प्राकृतापुढील अवस्था म्हणून अपभ्रंश भाषा सिद्ध झाली. संस्कृत आचार्यांनी संस्कृत व महाराष्ट्री प्राकृतानंतरचे तिसरे स्थान अपभ्रंश भाषेला दिलेले आहे. इसवी सनापूर्वी दोन शतके जे अपभ्रंश शब्द अपाणिनीय अतएव अपशब्द समजले जात असत, तेच इसवी सन सहाव्या शतकाच्या सुमारास एक साहित्याची भाषा या संज्ञेला प्राप्त झाले आहेत.

अपभ्रंश भाषेला अनेक वर्षे **देशभाषा** या नावाने संबोधिले जात असे. संस्कृताचार्यही तसेच म्हणत. "षष्ठोऽत्र भूरिभेदो देशविशेषादपभ्रंशः।" असे रुद्रट याने म्हटले आहे. (रुद्रटकृत काव्यालंकार २–१२)

स्वतः अपभ्रंश भाषीय कवीही आपल्या भाषेला **देशभाषा** असेच म्हणत असत. अपभ्रंश भाषेचा सुप्रसिद्ध कवी 'स्वयंभू' हा आपला 'रामायण' ग्रंथ ग्रामीण अथवा देशी भाषेत रचला आहे असे म्हणतो. त्याने म्हटले आहे की, "**देसी भाषा**-उमय तडुज्जल। कवि-दुक्कर-घण-सद्द-सिलायल॥" (रामायण १) तसेच "छुडु होंति सुहासिय–वयणाइं। **गामेल्ल भास** परिहरणाइं" (रामायण १-३)

अपभ्रंश भाषेचा दुसरा प्रसिद्ध कवी 'पुष्पदंत' हाही अपभ्रंश भाषेला 'देशी' या नावानेच संबोधितो. 'महापुराण' या ग्रंथात तो म्हणतो,

"णाउ हउं होमि वियक्खणु ण मुणमि लक्खणु छंदु **देसि ण** वियाणमि।" (महापुराण १–८)

'ज्युल ब्लाख' या परकीय विद्वानाने 'लॉ लांग मराठी' आणि 'ल इंदो आर्या' या दोन ग्रंथात अपभ्रंश भाषेविषयी चर्चा केलेली आहे. मराठी भाषेचा विचार करताना त्याने अपभ्रंश भाषेला आंतरप्रांतीय विचारविनिमय करण्याची भाषा असे म्हटले आहे.

कोणत्याही भाषेचा विकास होण्यास तिचे काही नियम असतात. समाज स्थिर राहिला तरी भाषा बदलू शकते. तसेच, समाज अस्थिर होऊन बदलत राहिला तरीही भाषा स्थिर राहू शकते. सामाजिक परिवर्तनाचा प्रभाव भाषेवर हळूहळू पडत जातो. तथापी सामाजिक क्रांती घडून आली तरी सहसा भाषेची क्रांती होऊ शकत नाही. म्हणून वैज्ञानिकरीत्या प्राकृत भाषांमध्ये अपभ्रंश भाषेचे स्वतंत्र अस्तित्व स्वीकारावे लागते.

## अपभ्रंश भाषीय वाङ्मयाची रूपरेषा

अपभ्रंश भाषेतील काव्य उपेक्षणीय नाही. ते विपुल असून विविध प्रकारचे आहे. 'स्वयंभू' या महाकवीने अपभ्रंश भाषेतील काव्याचे बीजारोपण केले आहे. पुष्पदंत, धनपाल, हरिभद्र, जोइन्दु, रामसिंह, देवसेन, कनकामर, हेमचंद्र, सोमप्रभ, जिनप्रभ, जिनदत्त, जिनपद्म, विनयचंद्र, राजशेखर, शालिभद्र, अब्दुल रहमान, सरह, काण्ह इत्यादिकांच्या प्रतिभेने अपभ्रंश भाषीय साहित्याची प्रतिष्ठा वाढली आहे.

या साहित्यात पुराण साहित्य, रामकाव्य, कृष्ण काव्य, जैन परंपरेतील पौराणिक पुरुषांसंबंधी काव्य इत्यादी प्रकार आहेत.









नागकुमार चरित, जसहर चरिउ इत्यादी चरित काव्ये आहेत. कथाकाव्ये आहेत. जैन मुनींचे रहस्यवादी काव्य आणि बौद्ध सिद्ध कवींची रहस्य साधना आहे.

यात धार्मिक आदर्शांचे व्याख्यान आहे. त्याचबरोबर लोक-जीवनामधून उत्पन्न होणाऱ्या ऐहिक रसांचे प्रेमरंजित अनुकथनही आहे. यात नानाविध पुरुषांचे उदात्त जीवनचरित्रही आहे. तसेच, सामान्य वणिक् पुत्रांच्या सुखदु:खांच्या कहाण्याही आहेत.

या वाङमयात जैन तीर्थंकरांची भावोच्छ्वसित स्तुती, रहस्यमय अनुभूती, अनुभवपूर्ण सूक्ती आढळेल. तसेच बौद्ध सिद्धांची सहज-साधना व चिंतनपरता दिसून येईल. त्याचबरोबर लौकिक वैभव विलासाची झाक, उन्मुक्त वन्य जीवनातील शौर्य व स्नेहसिक्त गाथांची रसरशीत मनोहर चित्रे इत्यादी प्रकारांनी अपभ्रंश साहित्याची विशाल चित्रशाला शोभायमान् झालेली आढळून येईल.

इसवी सनाच्या आठव्या शतकापासून ते चौदाव्या शतकापर्यन्त अपभ्रंश भाषा साहित्य जवळजवळ सर्व भारतभर लोकप्रिय झाले होते. दक्षिण भारताचा काही भाग सोडून दिल्यास उर्वरीत भरत खंडावर या साहित्याचे साम्राज्य पसरले होते. बहुजन समाज त्याचप्रमाणे सुविद्य जनता या सर्वांनाच या साहित्याने आकृष्ट केले होते असे दिसून येईल. अपभ्रंश भाषा-वाङमयाचे गाढे व्यासंगी डॉ. नामवर सिह म्हणतात, "इसवी सनाच्या आठव्या शतकापासून ते चौदाव्या शतकापर्यन्त सुदूर दक्षिण सोडून शेष संपूर्ण भारत-वर्षातील सामान्य जन व शिक्षित लोकांच्या हृदयाची वाणी हे साहित्य होते. यावरून याचे भारतीय साहित्यातील महत्त्वपूर्ण स्थान सिद्ध होते." (डॉ. नामवर सिह–"हिंदी के विकास में अपभ्रंश का योग"–द्वितीय खंड–'साहित्य')

## संदेश रासक

अपभ्रंश भाषेत 'संदेश रासक' नामक सुंदर गीत आहे. ही खंडकाव्यात्मक रचना अब्दुल रहमान (इ. स. १२००) याची आहे. या काव्याची तीन प्रकरणे असून २२३ छंदातील ती लहान रचना आहे. पहिल्या प्रकरणात मंगलाचरण, कवीचा व्यक्तिगत अल्प परिचय, ग्रंथरचनेचा उद्देश व काही आत्मनिवेदन आहे. अशा रीतीने आरंभीच्या २३ छंदात भूमिका तयार केल्यावर दुसऱ्या प्रकरणात मूळ ग्रंथारंभ आहे. संदेश रासकचे कथासूत्र थोडक्यात असे आहे —

विजयनगरची एक प्रोषित-पतिका आपल्या प्रियकराच्या वियोगामुळे रुदन करीत एके दिवशी राजमार्गाने जात असताना एका पथिकाला पाहून धावत जाऊन थांबवते व तो कुठून आला आणि कुठे चालला असे त्याला विचारते. त्याने सांगितले की तो सामोर नगराहून आला असून स्तम्भतीर्थाला जात आहे. स्तम्भ-तीर्थाचे नाव ऐकताच नायिका एकदम भावविव्हल होते व म्हणते की अर्थलोभाने माझा प्रियकर मला सोडून तेथेच गेला आहे, तरी कृपया त्याला माझा संदेश घेऊन जा. अशा रीतीने त्या पथिकाला थांबवीत थांबवीत हळूहळू ती आपली विरह-व्यथा कथन करते. पथिक जाण्याच्या गडबडीत असतो व जाऊ लागतो तरीही तिच्या रुदनामुळे थांबतो आणि आणखी काही गोष्टी तिच्याकडून ऐकतो. शेवटी तो, तिचा पती कोणत्या ऋतूत निघून गेला असे विचारतो. ती ग्रीष्म ऋतू सांगून त्यानंतर एक वर्ष लोटल्याचे सांगते. या आठवणीने ती क्रमश: सहाही ऋतुंमध्ये आपली कशी अवस्था झाली याचे वर्णन करते. ग्रंथातील तिसरे प्रकरण या षड्ऋतू वर्णना-साठी रचले असावे असे दिसते.

पथिकाला संदेश देऊन ती थांबते तोच दक्षिण दिशेकडून तिचा पती तिला आलेला दिसतो. ग्रंथाचे शेवटी कवी म्हणतो की ज्याप्रमाणे तिच्या कार्याची अचानक सिद्धी झाली त्याप्रमाणे हे काव्य वाच-णाऱ्या वाचकांच्या कार्याची सिद्धी होवो. जो अनादी व अनंत आहे त्याचा जय होवो !

## रसग्रहण

कालिदासाच्या मेघदूताप्रमाणे संदेश रासक ही तेजस्वी मौक्तिक मणिमालाच होय.

या विरह-काव्याचा आरंभही मोठा चित्ताकर्षक आहे.

पथिकाला पहाताच विरहिणी जेव्हा उतावीळपणे त्याच्याकडे धावत जाते, त्यावेळी तिच्या कटिप्रदेशावरील मेखला सुटून जाते व कंकणे किणकिण ध्वनी करीत गळून पडतात. कशीतरी मेखला बांधीत ती बिचारी पुढे जाते तर तिची मोत्याची लड ओघळते व तिला सांभाळता सांभाळता नुपूरात पाय अडकून ती पडते. त्यानंतर अतीव लज्जायमान होत्साती ती संभ्रमावस्थेत उठते; तर तिला असे दिसून येते की तिचा स्वच्छ धवल पदर खाली पडला असून कंचुकीही अस्ताव्यस्त झाली आहे. तथापि तरीही आपल्या हातांनी स्तनभार कसा तरी झाकून ती बिचारी धडपडत त्या पथिकाजवळ जाऊन पोहचते. अनुकंपा निर्माण व्हावी म्हणून कवीने विरहिणीचे हे असे चित्र रेखाटले आहे.

त्यानंतर ती जेव्हा संदेश कथन करते त्यावेळी स्त्री-हृदयाची परवशता, आकुलता आणि विदग्धता ही सारी प्रभावीपणे शब्दां-कित झाली आहेत. संदेश सांगताना विरहिणी इतकी व्याकुळ होऊन रुदन करते की पथिकाला ते सहन होत नाही. तो म्हणतो, "हे देवी !

कसंही करून आपले अश्रू थांबवा व प्रवासाला निघालेल्या या पथिकाला अमंगल चिंतू नका." यावर ती अतिशय सरळपणे म्हणते, "मइँ न रन्नु विरहग्गि धूम लोयण सवणु ।" (मी थोडसे रुदन करते आहे पण तो विरहाग्नीचा धूर आहे व त्यामुळे डोळ्यांना पाणी आले आहे )

त्या विरहिणीची व्यथा हृदयाला सरळ भिडते व तिचे कण विदग्धता उत्पन्न करतात. पतीने तिचे सारे सुख हिरावून घेतलेले असते. या गोष्टीला समुद्रमंथनाचे रूपक योजून विरहिणी सांगते, "रत्नांचा निधी असलेल्या माझ्या हृदयाचे विरहरूपी रवीने मंथन करून त्यातील सर्व रत्ने काढून घेतली आहेत."

शरद ऋतूचे वर्णन करताना विरहिणी म्हणते, "काय, त्या देशात धवल चांदणे असलेला चंद्र उगवत नाही का ? तेथे अरविंद-समूहात हंस पक्षी कल कल ध्वनी करीत नाही का ? का तेथे ललित ढंगाने प्राकृत काव्याचे पठण कोणी करीत नाही ? तेथील कोकिला पंचम स्वरात गात नाहीत का ? तेथे सूर्योदयानंतर कुसुमांनी वातावरण सुगंधित होत नाही का ? या सर्व गोष्टी होत असल्याच पाहिजेत, तथापी माझा पतीच अरसिक असला पाहिजे. कारण या अशा शरद कालातदेखील त्याला घरची आठवण होत नाही."

'संदेश रासक' वाचताना ते काव्य कोणी अहिंदूने रचले असावे असे वाटत नाही. याचे कारण या काव्यात संस्कृत व प्राकृत काव्यातील अनेक रूढींचा उल्लेख योजला आहे. सामोर नगरीच्या वर्णनात फळे फुले धारण करणाऱ्या वृक्षांची सूची तसेच षडऋतू वर्णनात कवीच्या वेळच्या रूढींचे पालन केले गेले आहे. या व्यतिरिक्त कवीने संस्कृतातील प्रसिद्ध छंदांचा अपभ्रंश भाषेत अनुवाद करून गोवला आहे. उदाहरणार्थ,

"हारो नारोपितः कंठे मया विश्लेष भीरुणा ।
इदानी मन्तरे जाताः सरित्सागर भूधराः ॥ "

यावरून असे दिसते की अब्दुल रहमान यास संस्कृत, प्राकृत व अपभ्रंश साहित्याच्या परंपरांचे चांगले ज्ञान होते व आपल्या अध्ययन-अनुभवाचे सगळे सार त्याने या काव्यात आणले आहे.

हे सर्व काव्य ग्राम्य अपभ्रंश भाषेत लिहिलेले नाही. वस्तुतः यातील भाव व भाषा या दोन्हीवर नागरतेची छाप आहे. छंदांची विविधता आणि अलंकारांची सजावट या दोन्ही दृष्टींनी हे काव्य अतिशय सुशोभित झाले आहे. वानगीदाखल काही पंक्ती पुढे दिल्या आहेत :—

"जिहि अंगिहि तूँ विलसियउ, ते दद्धा विरहेण ।" ॥ ४१ ॥

(नायिका म्हणते :—ज्या अंगांवरोबर तू विलास केलास ती अंगे विरहाने दग्ध होत आहेत.)

"पिउ हउं थक्किय सयलु दिणु तुह विरहग्गि किलंत ।
थोडइ जलि जिम मच्छलिय तल्लोविल्लि करंत ॥ ५२ ॥"

(प्रियकरा, तुमच्या विरहाग्नीमध्ये मी सारे दिवस होरपळून निघून थकून गेले आहे, ज्याप्रमाणे थोड्याशा जलात मासे तळमळतात तशी)

"मइँ जाणिउं प्रिय विरहियह, कवि धर होइ वियालि ।
णवर मयंकु वि तिह तवइ जिह दिणयरु खयकालि ॥ ५३ ॥"

(प्रियकरा, मला वाटत होते की विरहिणीला संध्यासमयी चंद्राच्या प्रकाशात थोडासा थंडावा लाभेल. परंतु प्रलयकाली जसा सूर्य तापतो, तसा हा चंद्रमाही तापला आहेसे वाटते.)

अपभ्रंश वाङमयाचे गाढे व्यासंगी डॉ. नामवर सिंह 'संदेश रासक' या काव्यावर भाष्य करताना म्हणतात,

"या रास काव्याशी जुळणारे एकच रास काव्य राजस्थानी भाषेत आहे व ते म्हणजे 'वीसलदेव रास' हे होय. राजस्थानी व हिंदीमध्ये अनेक रास काव्ये असली तरी ती सर्व भिन्न आहेत. त्या सर्वांत कोणी राजा असून त्याचे युद्ध अथवा विवाह याचेच वर्णन आहे. काव्यदृष्ट्या 'संदेश रासक' याचे अपभ्रंश साहित्यात विशेष स्थान आहे." (डॉ. नामवर सिंह :—"हिंदी के विकास में अपभ्रंश का योग"—द्वितीय खंड—'साहित्य').

**अपभ्रंश भाषेतील शृंगार व वीररसात्मक काव्य**

अपभ्रंश भाषेत जैन मुनी आणि बौद्ध सिद्ध यांचे धार्मिक साहित्य वरेच आहे. तथापि या साहित्यामध्येही ऐहिक जीवना-





अनुक्रमणिका

वरील शृंगारिक व वीररसात्मक ललित रचना आढळून येते. जैन मुनींच्या आचारप्रधान सूक्तींमध्ये उत्साह आणि दर्प भरलेला दिसून येतो. या जैन मुनींच्या चरित्र काव्यातून व पुराणांमधून युद्धाचे वर्णन मिळू शकते. तथापी या वर्णनात हत्तींचे चित्कार, घोड्यांच्या टापांचे आवाज आणि शस्त्रास्त्रांच्या नांवांची लांबलचक यादी याच गोष्टी अधिक दिसून येतात. चरित्र व पुराण काव्यात खऱ्या जातिवंत वीर-हृदयाचा उत्साह नाही. तथापी असे खरेखुरे जातिवंत शौर्य व त्याचा आविष्कार पहावयाचा झाल्यास हैम व्याकरणात आलेली उदाहरणे अभ्यास करण्यासारखी आहेत. हेमचंद्राच्या प्राकृत व्याकरण ग्रंथात संकलित केलेल्या रचनांमध्ये अशा काव्यांचाच अधिकांश आहे. मात्र हेमचंद्राने ही मधुर काव्ये कोणत्या काव्यग्रंथांतून घेतली आहेत ते सांगता येत नाही. कारण या काव्यांचे कवी अज्ञात आहेत. शौर्याबरोबरच शृंगारही या काव्यात आलेला आहे. हेमचंद्राच्या ग्रंथात जी नीती, अन्योक्ती अथवा धर्मविषयक रचना आहे त्यापैकी काहीचा आदी स्रोत जैन काव्यग्रंथांतून मिळतो. तथापी शृंगार व वीररसात्मक काव्यांची उदाहरणे यांचा मूळ उगम सापडत नाही. हा उगम सापडत नसल्यामुळे हे कवी अज्ञातच होत. तथापी त्यांच्या काव्याचे वैशिष्ट्य झटकन् नजरेत भरते व या कवनांमुळे अपभ्रंश साहित्याला एक वेगळीच कमनीय शोभा प्राप्त झाली आहे हे निश्चितच. म्हणूनच, "शौर्य व शृंगार यासंबंधी असे असंख्य दोहे आहेत की ज्यांचे आदी स्रोत अद्याप अज्ञात आहेत. या काव्यांचे रचयिते जैन कवी असोत अगर जैनेतर लोक-कवी असोत, इतके निश्चित् की संपूर्ण अपभ्रंश साहित्यात त्यांचे सौंदर्य सर्वांपेक्षा आगळे आहे." असे डॉ. नामवर सिंह यांनी भाष्य केले आहे. (डॉ. नामवर सिंह:–"हिंदी के विकास में अपभ्रंश का योग"–द्वितीय खंड–'साहित्य').

हैम व्याकरणात अपभ्रंश भाषीय लोक-कवींच्या काव्यांची जी उदाहरणे संकलित केली आहेत त्यात केवळ पुरुषांचे पौरुषच नाही तर त्याच्या पार्श्वभूमीला असलेले वीर-रमणींचे दर्पयुक्त प्रोत्साहन आढळून येते. एकीकडे शिवाचे तांडव नृत्य तर दुसरीकडे त्याच्या पार्श्वभूमीला शक्तीचे लास्यही आहे. या काव्यात युद्धावाचून उदासीनता वाटणाऱ्या अशा स्त्रिया आहेत. सामान्यतः स्त्री आपला वल्लभ युद्धातून अल्पकाल विश्रांतीस्तव घरी परत आला की त्याला आपल्या पदरांखाली झाकून सुख शांतिपूर्वक काही दिवस राहील. त्याने परत समरभूमीवर जाऊ नये असेही बहुधा इच्छील. तथापि येथे प्रिया म्हणते,

"खग्ग विसाहिउ जहिं लहहुँ, प्रिय तहि देसहिं जाहुँ।
रण-दुब्भिक्खें भग्गाइं, विणु जुज्झें न बलाहुँ।।" (हैम व्याकरण)

(प्रियकरा, आपण या कोणत्या देशात आलो आहोत ? येथे आल्यापासून युद्धाला विराम पडला आहे. आपण अशा एखाद्या देशात जाऊ की जेथे खड्गांचा खणखणाट चालू असेल. मला तर युद्धाशिवाय दुर्बलता आली आहे व युद्धावाचून स्वस्थता लाभत नाही.)

एखादी स्त्री पार्वतीच्या दर्शनाला जाऊन काय वरदान मागेल? ती आपल्याला पुत्र मागेल. पुत्र असल्यास धन मागेल. धन असल्यास अखंड सौभाग्य मागेल. पण या काव्य-लोकातील स्त्री अद्भुत आहे. ती काय मागणी करते पहा :—

"आयहिं जम्महिं अन्नहिं वि, गोरि सु दिज्जहि कंतु।
गय-मत्तहं चत्तकुसहं जो अब्भिडइ हसंतु।।" (हैम व्याकरण)

ती घरी बसल्या बसल्या ही मागणी करणार नाही, तर स्वतः रणांगणावर जाऊन पतीबरोबर राहील व त्याला प्रोत्साहन देईल. पतीने आपल्या खड्गाने अरि–शीरे उडवून दिली आहेत व मगच तो परत फिरला आहे हे पहाण्यात समाधान मानील.

या काव्यात असे स्वामीभक्त योद्धे आढळतात की जे रणात स्वामीकार्यार्थ आधी कोण पुढे जातो या अहमहमिकेत आपसात भांडून मरतील.

अशा शूर वीर, उत्साही नरनारींच्या शौर्य वर्णनाबरोबरच त्यांच्या प्रणयाचेही वर्णन या अपभ्रंश काव्यमौक्तिकमालेत आढळते. अशा या नरनारींचे प्रेम कसे असेल ? पलंगावर पडल्या पडल्या विरहाने व्याकुळ होणाऱ्या नागरजनांचे ते प्रेम नव्हे. या प्रणयात निर्व्याजता, सरलता व उघड्या मनाचा मोकळा साधा भोळा भाव आहे.

दोन स्तनांमधील अंतर कमी असलेल्या अशा पुष्टस्तनी अनेक असतात. तथा नायिकेच्या मनात पुढील कल्पना क्वचितच येईल. ती अशी :—हळूहळू स्तनयुगुल इतके उत्तुंग होत जाते की त्यामुळे नायिका सचिंत होऊ लागते. कारण त्यामुळे तिच्या प्रियकराचे मुख तिच्या मुखापर्यन्त पोहचणे अशक्य होऊ लागते. त्यामुळे ती आपल्या वक्षस्थलावरच रागावते.

पुरुष अनादि कालापासून स्वेच्छाचारी दिसून येतात. कुठेही रममाण होत असतात. तथापि पत्नी त्याचा त्याग कसा करू शकणार ? आग लागली तर घर जळू शकते. म्हणून घराचा उपयोगच करायचा नाही असे कोणी म्हणल का ? ही कल्पना पहा.

एका काव्यात पुढील कल्पना आली आहे. प्रियकराच्या अनुपस्थितीत नायिका नाना प्रकारचे संकल्प करते. यावेळी अशी क्रीडा करावयाची की तशी आतापर्यन्त कधीच केली नसेल. ती अशी की ज्याप्रमाणे मातीच्या नव्या घड्यात पाणी भरताच ते जसे घड्याच्या कणाकणात भिनले जाते, त्याप्रमाणे मी प्रियकराच्या सर्वांगात प्रवेश करीन. तथापि तो प्रथम आला तर पाहिजे. 'प्रबंध चिंतामणि' असे मनोहर काव्य आहे. अपभ्रंश भाषतील प्रणय काव्याची हिंदी भाषेतील प्रणय काव्याशी तुलना करताना डॉ. नामवर सिंह म्हणतात,

"अपभ्रंश काव्यात चित्रित केलेल्या प्रणयी जीवनात जी सरलता आणि निर्व्याजता आहे ती हिंदीच्या रीती काव्यात आढळणे कठीण आहे. हिंदीत कला आहे, चातुरी आहे व चमत्कृतीही आहे. घागरीत सागर समाविष्ट करण्याची करामतही हिंदीत असू शकेल. तथापि घागरीत घागरभर अमृत भरणे ही अवघड किमया








अपभ्रंश कवींनी केलेली आढळेल. घागरीत सागर भरणे कठीण [खरे, पण घागरीत आपले हृदय भरणे अधिक कठीण आहे." ] (डॉ. नामवर सिंह :—"हिंदी के विकास में अपभ्रंश का योग" द्वितीय खंड–'साहित्य')

हेमचंद्रलिखित प्राकृत व्याकरण ग्रंथातील आणखी दोनच उताऱ्यांचा येथे निर्देश करून अपभ्रंश काव्याचा हा धावता आढावा थांबवतो.

"अंगहि अंग न मिलिउ हलि अहरें अहरु न पत्तु ।
पिअ जो अन्तिहे मुह-कमलु एम्वइ सुरउ समत्तु ॥"

(हे सखी ! अंगाला अंग मिळाले नाही, अधराला अधर-प्राप्ती झाली नाही. प्रियकराचे मुखकमल पहाता पहाताच सुरत समाप्ती झाली.)

"बिम्वाहरि तणु रयण-वणु किह ठिउ सिरि आणन्द ।
निरुवम–रसु पिएं पिअवि जणु से सहो दिणणी मुद्द ।"

(तन्वीच्या बिंबाधरावर रदनव्रणाची (दंतक्षताची) आनंदश्री कशी स्थित झाली आहे ? निरुपम रस पिऊन जणु काय प्रियकराने राहिलेल्या भागावर मुद्रा (मोहर अगर शिक्का) उठविली आहे.)
—"हेमचन्द्रकृत प्राकृत व्याकरण"

अपभ्रंश भाषा ही प्राकृतातूनच निष्पन्न झाल्यामुळे प्राकृत भाषेची सर्वच वैशिष्ट्ये तिच्यात आहेत. अपभ्रंश म्हणजे सामान्य जनांनी केलेले प्राकृत भाषेचे एक प्रकारे सुलभीकरण होय असेही म्हटल्यास चालण्यासारखे आहे. समाजातील विशिष्ट शिष्टजन जेव्हा प्राकृत भाषा बोलत व ती त्यांची साहित्य भाषाही होती, त्यावेळी सर्वसामान्य जनांची अपभ्रंश भाषा होती. ही अशिष्ट भाषा कालांतराने शिष्ट भाषा झाली. ग्रामीण अंतःकरण स्पष्टपणे प्रतिबिंबित करणे हे जसे प्राकृत काव्याचे वैशिष्ट्य आहे तसेच ते अपभ्रंश भाषेचेही आहे. त्यामुळे विषय व श्रृंगार-वीर इत्यादी रसांच्या आविष्करणाच्या एका विशिष्ट पद्धतीमुळे अपभ्रंश काव्याचा बहुतांश भाग मराठी लावणीला पूर्वगामी वाटतो.

हैम व्याकरण ग्रंथात शृंगार काव्याची जी उदाहरणे संकलित केली आहेत ती प्राकृतातील गाथा सप्तशतीमधील काव्यासारखीच वाटतात. "हालाची गाथा सप्तशती हा एक संग्रह आहे. निर-निराळ्या कवींच्या लावण्या त्यात एकत्र केलेल्या आहेत. आणि त्या वेळेसच ती लावणी म्हणणाऱ्यांची परंपरा स्थापित झाली होती असे दिसते." असे डॉ. केतकर स्पष्टपणे म्हणतात. (डॉ. श्री. व्यं. केतकर :–"महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण"–प्रकरण ५ वे–'मराठी वाङ्मयाचा पहिला काल व कवींचे आपल्या अस्तित्वाचे समर्थन.')

"हाल सातवाहनाची गाथा सप्तशती" या ग्रंथात श्री. स. आ. जोगळेकर यांनी गाथा सप्तशतीमधील काव्यांचे सर्वांगपरिपूर्ण रसग्रहण केलेले आहे व अखेरीस "मराठी पोवाडा व लावणी यांचे मूळ आपल्याला गाथा सप्तशतीत सापडलेसे होईल." अशा स्वरूपाचा

( पृष्ठ २६ वर )








श्री. दामू धोत्रे यांना
ना. यशवंतराव चव्हाण
यांच्या हस्ते
सूवर्णपदक

# सहस्त्र ज्योती आणि गजराजांची मस्ती

१९३३ सालच्या फेब्रुवारीमध्ये प्रो. इझाको यांच्या रशियन सर्कसबरोबर माझा करार झाला. करार, जनावरांचे कामांबद्दल, एकूण साडे तीन वर्षांचा होता. इझाकोंची रशियन सर्कस म्हणजे एक अवाढव्य फिरते शहरच होते. आशिया खंडात ही सर्कस त्यावेळी सर्व सर्कशींमध्ये मोठी व सुधारलेली होती. खेळाडूंपैकी वहुतेक जण रशियन, इंग्लिश, फरेंच, जर्मन, हंगेरीयन वगैरे युरोपियन राष्ट्रातील होते. काहीजण चिनी होते. भारतीय असा मीच काय तो एकटा खेळाडू होतो तिथे. सर्कसचा शिकारखाना प्रचंड होता. त्यात शिकवलेली घोडीच मुळी ४५ होती. रिंगमास्तर सर्व जण युरोपियन होते. सर्कसचा तंबू अतिशय मोठा असून त्यात एका वेळी पाचसहा हजार प्रेक्षक सहज वसत.

प्रो. इझाकोंच्या या अवाढव्य सर्कसचा मुक्काम मद्रास शहरात पडला होता. मद्रास प्रांतातील लोक सर्कसचे मोठे शौकीन. त्यामुळे तेथील मुक्काम मोठा गर्दीचा जात होता. सर्कसला उत्पन्न सपाटून होत होते. व सगळयांच्या खिशात पैसा खुळखुळत होता.

मद्रासच्या याच मुक्कामात माझ्यावर असा एक प्रसंग गुदरला होता की त्याची आठवण मला जिंदगीभर राहिली आहे. आजसुद्धा त्या प्रसंगाची आठवण आली की माझे अंग भीतीने शहारते. मन थरारते.

आकाश त्या दिवशी काळवंडले होते. विजा चमकत होत्या आणि मेघांचा गडगडाटही मधूनमधून होत होता. तशा मलूल वातावरणात, वाघ-सिंहांचा एक मिश्र गट पिंजऱ्यात घेऊन मी त्यांचे काम घेत होतो. कसरतींचे पहिले झाड (पिरॅमिड) मी संपवले आणि दुसऱ्या झाडाच्या उभारणीसाठी पिंजऱ्यातील स्टुले मी इथून तिथे

## दामू धोत्रे
### शब्दांकन
## भानू शिरधनकर

हालवीत होतो. लोकांचा टाळयांचा कडकडाट चालू होता. इतक्यात शहरातील विद्युतप्रवाह एकाएकी खाडकन् बंद पडला. आणि त्यावरोबर तंबूतील एकूण एक दिवा मालवला गेला. आकाशाच्या किंवा वाहेरच्या प्रकाशाचे टिपूसही तंबूच्या जाड कनातीतून आत येणे शक्य नव्हते. पण वाहेर तरी प्रकाश कुठला असणार! सगळे शहरच काळोखात गुरफटले गेले. सर्कसचा तंबू जणु काळीभोर कांबळी पांघरून राहिला होता.

काळोख ! काळोख ! मागे काळोख, पुढे काळोख ! माझ्या सभोवताली सगळीकडे काळोखच काळोख पसरला. काळोखात मला काहीच दिसत नव्हते. तसल्या मिट्ट काळोखात, निःशस्त्र स्थितीत, मी जनावरांच्या पिंजऱ्यात मध्यभागी उभा होतो. माझ्या भोवताली हिंस्त्र प्रवृत्तीची सहा क्रूर जनावरे उभी होती. ती फुरफुरत होती. त्यांचे जबडे उघडलेले होते. डोळे आसुसलेले होते. त्या जनावरांपैकी एखाद्याने जरी उचल घेतली तर? माझ्या मनात तो विचार झरकन् येऊन गेला नि माझ्या अंगातून विजेची लहर चमकून गेली. मी भीतीने थरारलो. पण एका क्षणात मी सावरलो.

हाताजवळचे एक लाकडी स्टूल मी उचलून घेतले. त्याचे पाय पुढे करून मी ते पोटाशी धरले आणि तशाच स्थितीत मी पाठमोरा मागे मागे जाऊ लागलो. पिंजऱ्यात ज्या वाजूला जनावर नाही अशी

माझी खात्री होती, त्याच बाजूला मी मागे सटकू लागलो. माझ्या हालचालीमुळे, एखाद्या जनावराच्या मनातील हिंस्त्र भावना जागृत होऊन ते माझ्यावर चालून येईल ही भीती माझ्या मनात होती. पण मी अगदी सावकाश मागे सरकत होतो. पिंजऱ्याच्या कडेला माझी पाठ लागे तोवर मी मागे सटकलो. पिंजऱ्याच्या गजांना माझी पाठ लागताच त्याबाजूने आपण सुरक्षित आहोत याबद्दल माझी खात्री झाली. आता कुणी वाघ अगर सिंह त्याबाजूने मला पकडू शकणार नव्हता. कठड्यास पाठ टेकून मी समोर स्टूल रोखून धरले. कुणी जनावराने घुसारा केलाच तर त्याचा पहिला धडाका स्टूलावर बसणार आणि त्यामुळे तसल्या कभिन्न काळोखातही मला हल्ल्याची पूर्वसूचना मिळणार याची खात्री झाली.

ज्या क्षणी विजेचा प्रवाह बंद पडला त्याच क्षणी माझा पहिला पिरॅमिड संपला होता आणि मी जनावरांना आपापल्या जागी जाऊन बसण्यास फर्मावले होते. त्यांच्यापैकी तीन सिंह आपापल्या बैठकीवर जाऊन चुळबुळत होते. एक सिंह आणि सिंहीण मोठ्या उंच स्टुलांवरून खाली येण्याच्या तयारीत होती आणि त्याच्याही माथ्यावर एक बळकट पण चिडखोर वाघ टेबलावरून उतरत होता. त्या वाघाला माझ्या अगोदरच्या ट्रेनरने चांगले वागवले नव्हते. 'आता त्याचा डूख तो माझ्यावर तर काढणार नाही ना?' माझ्या मनात शंका थैमान घालीत होत्या.

अंगातील सर्व शक्ती एकवटून, काळोखातच मी मोठ्याने हाका मारू लागलो. मी ओरडून म्हटले, 'प्रकाश, प्रकाश, टाका! उजेडाची मला जरूरी आहे. लाइट्स, प्लीज!'

तंबूत पसरलेल्या भयाण काळोखाला व शांततेला भेदून, माझा आर्त आवाज प्रेक्षकांच्या कानी गेला. उजेड, उजेड! माझे ते करुणाजनक शब्द, त्यांच्या पैकी काही जणांच्या हृदयाला भिडले असावेत. त्यांच्यातील एका कल्पक प्रेक्षकाने चटकन्

# सुविख्यात सर्कसपटू श्री. दामू धोत्रे यांच्या 'सर्कस जीवना'त अनुभवलेले दोन चित्तथरारक प्रसंग....

आपल्या खिशातून आगपेटी काढली. आणि काडी पेटवून, हात लांब करून, त्याने मला उजेड दाखवण्याचा प्रयत्न केला. त्या भयाण काळोखात, एका इवल्याशा काडीचा उजेड तो कितीसा पडणार? पण त्याच्या कल्पकतेमुळेच माझे प्राण त्या दिवशी वाचले हे खरे! कारण त्याचे पाहून, असंख्य प्रेक्षकांनी आपापल्या खिशात हात घातले नि आगपेट्या काढून, एका मागे एक काड्या पेटवण्यास व मला प्रकाश दाखवण्यास सुरवात केली. एक विझली, तर दुसरी काडी पेटे! एकाच्या हातातील विझली तर दुसऱ्याच्या हातातील पेटे! एकाच वेळी पेटणाऱ्या सहस्रावधी काड्यांचा तो प्रकाश मिणमिणता का होईना, पण प्रकाशमान होता यात संशयच नाही.

एकाच वेळी सहस्त्रावधी मिणमिणत्या ज्योती चोहीकडे तेवत असलेल्या पहाण्याची संधी तुम्हाला कधी आली आहे काय? आणि तीही तंबूच्या आवरणात, काळाकुट्ट काळोखात! त्या दिवसाचे ते दृश्य मोठे अविस्मरणीय होते. आज या मितीला सुद्धा ते दृश्य माझ्या डोळ्यासमोर दिसत आहे. त्या असंख्य मिणमिणत्या प्रकाशज्योती पाहून मला दीपावलीच्या उत्सवाची आठवण झाली. काड्यांच्या नसत्या मिणमिणत्या मंद प्रकाशामुळेच मला जीवदान मिळाले होते नाही का? प्रेक्षकांच्या प्रसंगोचित सावधानतेमुळे मी भारून गेलो. निरनिराळ्या ठिकाणांहून ओढल्या जाणाऱ्या व विझणाऱ्या काड्यांकडे पिंजऱ्यातील जनावरांचे लक्ष स्वाभाविकच ओढले गेले होते.

**'सोनिया'ची सकाळची न्याहारी**



त्या काड्यांचा उजेड, त्यांच्या डोळ्यातून प्रतीत होत असलेला मला दिसून येत होता. त्यावरूनच, त्यांच्या मनातील विचार मी ओळखू शकत होतो.

चार पाच मिनिटेपर्यंत, मी त्या अंधार-कोठडीत जीव मुठीत धरून उभा होतो. कुणाला वाटेल, जीव धोक्यात घालून, जनावरांचे रिंगणात मी त्यावेळी, तसा उभाच कां राहिलो? हळूच तिथन निसटून मी बाहेर कां आलो नाही?

उत्तर अगदी सोपे आहे. पशुशिक्षक या नात्याने माझ्यावर मोठीच जबाबदारी होती. वाघ आणि सिंह यांचा मिश्र गट पिंजऱ्यातच काळोखात सोडून मी बाहेर पळून येणे, खास उचित झाले नसते. मी तसे केले असते तर एकमेकांकडे नेहमीच वैरभावाने पहाणारी ती जनावरे एकमेकांना मारल्याशिवाय रहाती ना! विशेषत: सिंहाच्या रोषास पात्र झालेला पिंजऱ्यातील वाघ त्यात बळी पडला असता यात मला तरी संशय वाटत नाही.

पण त्या दिवशी, काळोखाच्या आवरणातही ती सर्व जनावरे, शांतपणाने, शहाणपणाने वागली असेच म्हटले पाहिजे, मग त्याचे कारण काही असो. त्यांच्या या शांत वर्तणुकीचे कोडे मला विचार करता दुसऱ्या दिवशी उलगडले. वाघ, सिंह ही मांजराच्या वर्गात मोडणारी, रात्री वावरणारी श्वापदे आहेत. त्यांना काळोखातही चांगले दिसते. मी रोजच्या सारखाच समोर उभा असून, हुकूम सोडतोय हे त्यांना स्पष्ट दिसत होते, आणि मला पण, त्यांच्या प्रमाणेच स्पष्ट दिसत असावे अशी त्यांची माझ्यावद्दलची समजूत असल्यामुळेच, ती जनावरे शांतपणे वागली असावीत.

शहरातील विद्युतप्रकाश जसा एकाएकी तुटला तसाच तो एकाएकी पुन्हा सुरू झाला. तंबू आणि खेळाचे रिंगण पुन्हा प्रकाशात उजळून निघाले. भयाने व्याकुळ झालेल्या माझ्या मनाला दिलासा मिळाला. प्रेक्षकांच्या चेहऱ्यावर समाधान फुलले. टाळ्या कडाडल्या खरोखर त्या दिवशी प्रेक्षकांच्या समयसूचकतेमुळेच मी वाचलो होतो. त्या असंख्य प्रेक्षकांचे स्मरण होताच आजही मन कृतज्ञतेने भरून येते. त्या अनुभवानंतर प्रकाशाचे अभावी पुनरपि घोटाळा उडू नये म्हणून रिंगणाच्या बाजूस मी नेहमी दोन गॅसचे दिवे लावण्याची खास व्यवस्था करीत आलो आहे.

## हत्तीची मस्ती

सर्कशीत दाखल झाल्यावर लागलीच प्रो. इझाकोंनी मला हत्तीचे काम घेण्यास सांगितले होते. मी त्यांना म्हटले, 'तुमच्या हत्तींची कामे मी पूर्वी कधी पाहिलेली नाहीत. मला थोडे दिवस हत्तींची तालीम घ्यावी लागेल.'

इझाको म्हणाले, 'दुपारच्या खेळात मी हत्तींची कामे घेईन. ती तुम्ही पहा'. मी ते कबूल केले.

दुपारी त्यांचे काम पहाण्यासाठी मी रिंगणाच्या तोंडाशी उभा राहिलो. रिंगणात चार हत्ती आणण्यात आले होते. त्यात बॉय नावाचा एक हत्ती मस्तीत आलेला होता. ओळीतील पहिल्या तीन हत्तींनी हुकूमाप्रमाणे रिंगणात एक चक्कर घातली. पण बॉयने मात्र तसे न करता एखाद्या खुनी मारेकऱ्यासारखा तो इझाकोंच्या अंगावर धावला. पण त्याच्या माहुताचे त्याचेवर पूर्ण लक्ष होते. तो संकट ओळखून झटकन् मध्ये उभा राहिला. 'बॉय, बॉय' म्हणून चुचकारून त्याने त्याच्या कानास अंकुश लावला व त्याला आवरून रिंगणाबाहेर नेले. माहुताच्या धिटाईमुळेच प्रो. इझाको त्या दिवशी वाचले म्हणायचे.

तो प्रसंग पाहून माझ्या हिंमतीला मात्र तडा गेला होता. त्या दिवशी मला अन्न तर गोड लागलेच नाही पण झोपही धड आली नाही. त्या पिसाट हत्तीच्या रोषाला मी बळी पडणार या विचाराने मला घेरले. झालेला करार रद्द करून मी धोका टाळू शकलो असतो 'पण मग पशुशिक्षक म्हणून आजवर मिळवलेल्या मान्यतेचे काय?' हा विचार मला भेडसावू लागला. सर्व रात्रभर मी अंथरुणात तळमळत होतो. जीवन की मरण? मान की अपमान? काय पत्करायचे यातून! आयुष्यात हा प्रश्न अनेकदा माझ्यासमोर उभा राहिलेला आहे आणि त्या त्या वेळी मी नेहमी धैर्याने मृत्यूला तोंड देण्याचेच पत्करले आहे. आता सुद्धा करार रद्द करण्यापेक्षा त्या पिसाट हत्तीला तोंड देण्याचाच मी निश्चय केला.

दुसऱ्या दिवशी मी माहुतास बोलावून घेतले व त्याचे कडून मोठ्या युक्तीने बॉयच्या पायात काटेरी पट्टे व साखळदंड घालून घेतले. नंतर हातात चाबूक व काखेत उसाच्या तुकड्यानी भरलेली पिशवी घेऊन मी रिंगणात गेलो.

माहुताने बॉयला रिंगणात आणले. त्याचे पाय साखळीने जखडलेले असल्यामुळे, वेळ आलीच तर त्याच्या तडाख्यात न सापडता, आपण चटकन् पळून जाऊ अशी मला खात्री होती. माहुताने त्याला रिंगणातून एक गोल फेरी मारून आणले. तो फेरी मारीत असताना मी त्याला मोठ्याने हाका मारीत होतो, हुकूम देत होतो. उद्देश हा की माझा आवाज त्याने नीट ध्यानात ठेवावा. मधूनमधून उसाचे तुकडेही मी त्याला चारीत होतो व तो ते आवडीने खात होता.

रोज असा कार्यक्रम सुरू झाल्यावर मी त्याच्या पायातील साखळीची लांबी वाढवू लागलो. त्यामुळे जलद गतीने त्याला चालता येऊ लागले. दोन आठवड्यांचे आत मी त्याच्या पायातील साखळदंड काढून टाकला व मोकळेपणीच त्याला रिंगणात घेऊ लागलो. बाकीच्या तीन हत्तींप्रमाणेच तो शांतपणे काम करू लागला. थोड्याच दिवसांपूर्वी तो पिसाटासारखा वागत होता हे कुणाला सांगूनही खरे वाटले नसते आता.

बॉयला वठणीवर आणण्यातील माझे कौशल्य पाहून इझाकोंना आश्चर्य वाटले. कां वाटणार नाही? त्या हत्तीने त्यांना ठार मारण्याचीच वेळ आणली नव्हती का? तथापि इझाकोंना कौतुक वाटले तरी मी मात्र माझ्या यशाबद्दल काहीसा साशंकच होतो. बॉयच्या मस्तीचा काळ आता अगदी शिगेस येऊन पोचला होता आणि तो कितीही शांत वाटला तरी केव्हा अचानक दगा देईल याचा मला भरवसा वाटत नव्हता.

हत्तींच्या खेळातले माझे शेवटचे काम बॉयबरोबरच असे. तो मला सोंडेवर बसवून घेऊन रिंगणात एक चक्कर मारी व मी प्रेक्षकास अभिवादन करून टाळ्या घेत आत जात असे.

सर्कसचा पुढील मुक्काम त्रिचनापल्ली येथे झाला. एका रात्री, शेवटच्या कार्यक्रमाच्या वेळी मी बॉयच्या सोंडेवर बसण्यासाठी त्याच्या पुढ्यात गेलो. मला सोंडेवर बसता यावे म्हणून नेहमीप्रमाणे त्याने सोंड खाली वळवली. पण मी सोंडेवर बसताच, त्यान मला रोजच्या सारखे हळूच वर न उचलता, जोराने हिसका दिला. एखाद्या मुलाने अगदी सहजगत्या फटका मारून चेंडू हवेत टोलवावा तसा त्याने मला हवेत वर भिरकावून दिले. आठ–दहा फूट हवेत उंच उडून मी खाली कोसळलो पण कोसळता कोसळता, हात पाय टेकून जेमतेम जमिनीवर सावरलो. जमिनीवर टेकताच, विजेसारखा मी वर उठलो आणि एका क्षणात मी त्या पिसाट हत्तीसमोर उभा राहिलो. वर उठण्यास मला किंचितही वेळ लागता तर तो राक्षस माझ्यावर धावून आल्यावाचून रहाता ना!

'बॉय' मी जोराने ओरडलो.

रागाने तो आता वेडा झाला होता. किती अजस्र वाटला मला तो त्यावेळी. कान टवकारून, शेपूट उभारून आणि सोंडेची गुंडाळी करून तो माझ्याकडे रोखून बघत होता. टोकदार दीड फूट लांबीचे बळकट सुळे त्याने माझ्यावर रोखले होते. त्याच्या डोळ्याला डोळा भिडताच, मृत्यु जणु समोर उभा ठाकलेला मी क्षणभर अनुभवला. मी निःशस्त्र होतो. अंकुश तर राहोच पण नुसता चाबूकसुद्धा माझ्या हाती नव्हता. तरीही न डगमगता मी जागच्याजागी उभा राहिलो. त्याच्यावरील नजर बाजूस न वळवता मी माहुताकडून चाबूक आणि अंकुश मागून घेतला. तोंडाने मी त्याला सारखा साद घालत होतो. व हुकमी आवाजाने मी त्याला रोखून धरले होते. हिंमत न सोडता त्याच्यासमोर धीटपणे उभे रहाणे हेच त्यावेळी बचावाचे एकमेव साधन होते. माझे धैर्य तुटते तर ते मृत्यूला कवटाळण्यासारखेच झाले असते.



वार्टेलीवरील हत्ती : इझाका रशियन सर्कस : इंडोनेशिया १९३५

काही वेळ मी त्याला तसाच हाका मारीत राहिलो. त्याच्या बेफामपणाला त्यामुळे थोडासा आळा पडला. धीर येऊन त्याला चुचकारीत मी त्याच्या कानात अंकुश अडकावला आणि त्याला रिंगणाबाहेर घेऊन गेलो. तेवढ्यापुरते निभावले. त्याच्या मस्तीच्या तडाख्यातून मी वाचलो खरा; पण त्याच्या सोंडेच्या शेंड्यावर बसून सर्कसच्या रिंगणात फिरण्याची मला पुन्हा काही हिंमत झाली नाही. काही काळ मी तो कार्यक्रम बंद केला. ● ● ●









अनुक्रमणिका

[पृष्ठ २१ वरून शाहिरी]

निष्कर्ष काढला आहे. (श्री. सदाशिव आत्माराम जोगळेकर :—"हाल सातवाहनाची गाथासप्तशती".)

हालाच्या गाथांना जर लावण्या असे म्हणायचे तर ही अपभ्रंश काव्येही लावण्याच होत असेच म्हटले पाहिजे.

अब्दुल रहमान यांचे 'संदेश रासक' हे काव्य म्हणजे विप्रलंभ शृंगाराचे एक उत्तम उदाहरण आहे. अशा स्वरूपाची 'रास' काव्ये नंतर राजस्थानी भाषेत चारण-भाटांनी पुष्कळ रचली आहेत. नरपति नाल्ह याने रचलेले राजस्थानी भाषेतील 'वीसल देव रास' हे रास काव्य 'संदेश रासका'शी जुळणारे आहे. 'रास' याचा अर्थ रसपूर्ण असा आहे व अनेक विद्वानांना तो मान्य आहे.

हिंदी साहित्याचे काल विभाजन करताना त्यात 'वीरगाथा काल' हा एक काल गणला जातो (संवत १०५० ते संवत १३७५ पर्यन्त). या कालखंडात 'रास' अगर 'रासो' काव्य बरेच रचले गेले आहे व ते राजस्थानी चारण-भाटांनी रचले आहे. या राजस्थानी चारण अगर भाटांच्या भाषेवर अपभ्रंश भाषेची छाप दिसून येते. चारण वा भाटांच्या 'रासो' काव्यात वीररसाचे आधिक्य आलेले दिसले तरी 'रास' काव्याचा हा प्रकार अपभ्रंश भाषेतून राजस्थानीत आला असे 'संदेश रासक' या 'रास' काव्यावरून उघड होते.

मराठी भाषेतील वीररसात्मक पोवाडे उत्तरेतील चारण-भाटांच्या काव्याच्या अनुकरणाने आले आहेत असे अनेक विद्वानांचे मत आहे. म्हणजे पर्यायाने अपभ्रंश भाषेतील 'रास' काव्ये ही पोवाड्यांना पूर्वगामी ठरतात.

'संदेश रासक' हे काव्य ग्राम्य अपभ्रंश भाषेत लिहिलेले नाही व भाव आणि भाषा या बाबतीत त्यावर नागरतेची छाप आहे. मराठी शाहिरी काव्य बहुजन समाजाचे असले तरी ते सर्वस्वी ग्रामीण अगर जानपद नाही. अनेक शाहिरी कवनातील भाव व भाषा पहाता त्यावर नागरतेची छाप दिसून येईल. अनंत फंदी, रामजोशी व प्रभाकर या ब्राह्मण शाहिरांचे काव्य ग्रामीण नसून ते नागर भाषेतीलच आहे. इतकेच नव्हे तर होनाजी बाळ यांच्या काव्यावर नागरतेचाच ठसा जास्त आहे. म्हणून अपभ्रंश भाषीय 'संदेश रासक' या काव्यावर नागरतेची छाप असली तरीही ते मराठी शाहिरी कवनांना पूर्वगामी आहे असे म्हणता येईल.

अपभ्रंश भाषेच्या काळी "लावणिका" नामक ग्रामीण गीते रचली जात असत असे डॉ. पां. दा. गुणे यांचे मत असल्याचे श्री. ना. ग. जोशी सांगतात. (डॉ. ना. ग. जोशी :—"मराठी छंदोरचनेचा विकास"–प्रकरण :–'मध्योत्तर काल' यातील 'शाहिरी कवने' या परिच्छेदातील 'लावणी'). 'लावणिका' या नावावरून व ही ग्रामीण गीते होती हे लक्षात घता या 'लावणिका' म्हणजे 'लावण्या' असल्या पाहिजेत असे अनुमान करण्यास प्रत्यवाय दिसत नाही. 'लावणिका' या 'लावण्या'ना पूर्वगामी असल्या पाहिजेत.

• • •








# चक्रव्यूह



दर्दभऱ्या भावनांचा
कोलाहल माजविणाऱ्या
कादंबरिकेचा
थरारक उत्तरार्ध

—अशोक ज. आघरकर

तिच्या मनात सारखं येत होतं की आपण माधवच्या आजाराची खबर मिळताक्षणीच येऊन गेलो असतो तर उत्तम झालं असतं—परंतु आपण खोट्या प्रतिष्ठेपायी मन मारून चार दिवस इकडे आलो नाही—कदाचित चार दिवसांपूर्वी आपली मदत दोघांनाही विशेषतः सुधीरला अधिक फायदेशीर झाली असती, पण आता हळहळून काय उपयोग आहे?

अर्ध्यापाऊण तासांनी दारावर टकटक होताक्षणी रजनीनं चटकन् पुढं होऊन दार उघडलं. डॉक्टर आणि सुधीर आत शिरले. डॉक्टरांनी काळजीपूर्वक माधवला तपासलं अन् ते सुधीरला म्हणाले,

"मेहेंदळे, तुम्ही बाहेर जाऊन इंजेक्शन्स आणाल का? — अत्ताच्या आत्ता मिळाली तर काहीतरी उपयोग व्हायचा संभव आहे—"

सुधीरनं तयारी दर्शवताच त्यांनी कागदावर नाव लिहून दिलं अन् सुधीर प्रिस्क्रिप्शन घेऊन घाईघाईनं बाहेर पडला. तो गेल्यावर दोन-चार क्षणांनी डॉक्टर रजनीकडे वळून म्हणाले,

"तुम्ही कोण यांच्या?"

"मी माधवची—तुमच्या पेशंटची वर्गशिक्षिका आहे—तो आजारी आहेसं कळलं म्हणून पहायला आले होते. का?"

"नाही—नाही मला वाटलं तुम्ही घरातल्या कोणीतरी असाल—म्हणून तुम्हाला काही सांगण्यापूर्वी—जाऊ दे!"

"घरातली—रक्ताचं नातं नसलेली असेल म्हणून काय झालं? काही असेल तर स्पष्टपणे सांगा—मला शक्य तेवढं करीन मी!"

"मला एवढंच सांगायचं होतं की पेशंटची परिस्थिती एकदम सीरीयस आहे—आजची रात्र निभणं कठीणच दिसतंय्! ते सांगावं कसं मेहेंदळ्यांना म्हणून त्यांना मुद्दाम बाहेर पाठवलं—कारण त्यांचा हळवा, मायाळू स्वभाव मला ठाऊक आहे. म्हटलं तुम्ही घरातल्या असाल तर तुम्हाला सांगून ठेवलेलं बरं—म्हणजे मनाची तयारी करून ठेवाल! आयत्या वेळी जर मेहेंदळे एकटे असले तर काय होईल कल्पनाच करवत नाही—पण काय तुम्ही परक्याच पडलात—"

"तुम्ही यासाठी विचारलंत होय?" रजनीनं खुलासा केला, "तसं असेल तर मी मग राहीन की इथं—पण डॉक्टर एवढंच सांगा, तुम्हाला बिल्कुल आशा नाही का?"

"असं कसं म्हणेन मी? आजची रात्र उजाडली म्हणजे धोका नाही—पण ती उजाडणंच मला कठीण दिसतंय्! तुम्ही इथंच रात्रभर असला तर उत्तमच! निदान मेहेंदळ्यांचं लक्ष पेशंटच्या स्थितीपासून थोडं तरी दूर जाईल. अशा वेळी कुणीतरी आधाराला असलेलं चांगलंच —कशाही परिस्थितीत त्यांना तुमचा उपयोग होईल! मात्र मी सांगीतलंय् त्याचा त्यांना मात्र संशयही येऊ देऊ नका!"

"बी शुअर! ते माझ्याकडे लागलं!"

रजनीनं आत्मविश्वासानं सांगीतलं. डॉक्टरांचं म्हणणं तिला पटलं होतं–वेळ येणार होती ती काही सांगून नव्हे–तेव्हा काय वाटेल ते झालं तरी आपण इथं थांबायचं म्हणून तिनं ठाम ठरवून टाकलं होतं.

सुधीर परतल्यावर डॉक्टरांनी माधवला इंजेक्शन दिलं अन् "तुम्ही काळजी करू नका!" म्हणून त्याला वरवर का होईना परंतु आश्वासन देऊन ते मग रजनीकडे सूचक कटाक्ष टाकून निघून गेले.

"वघा! डॉक्टर आले त्यामुळं इंजेक्शनही गेलं वेळच्या वेळी–अन् त्यांनीही नाही का सांगीतलं आता काळजी करायचं कारण नाही म्हणून?"

"हं ! म्हणाले खरे डॉक्टर–वघू या!" सुधीर अर्धवट स्वत:शी अर्धवट उघड म्हणाला. एवढयात घडयाळात अकराचे ठोके पडले त्यासरशी त्यानं एकवार चटकन् घडयाळाकडे पाहिलं अन् तो रजनीला उद्‌देशून म्हणाला,

"रजनीवाई, अकरा वाजून गेले वाटतं! माफ करा हं–गडवडीत माझंही लक्ष गलं नाही घडयाळाकडे. तुम्हीही माझ्या परवानगीची वाट पाहिली नसती तरी चाललं असतं. तुमच्या घरची मंडळी वाट पहात असतील!"

"मी घरी सांगून आल्येय् की जरूर वाटली तर मी रात्रभर तिथंच राहीन म्हणून ! मला वाटतं मी इथं राहिले तर तुम्हांलाही सोवत होईल–खरंच, आठ दिवस आजाऱ्याच्या शेजारी एकटयानं वसून तुम्ही कसे काढले असतील तुम्हीच जाणो ! तेव्हा मी इथंच रात्रभर वसणारच आज–तुम्ही तरी थोडा वेळ झोप घ्या ! तुम्हाला काय वाटतं?"

"मला काय वाटतं ते सांगणं म्हणजे स्वार्थ साधण्यासारखंच आहे की!" तो किंचित् स्मितपूर्वक म्हणाला! तुमची सोबत होईल हे खरं–पण पण तुम्हाला निष्कारण त्रास का म्हणून मी द्यावा हेही खरच !"

"त्यात कसला आलाय् त्रास–अहो हे एवढंसं करायलाच पाहिजे कुणीही कुणासाठी ! नाहीतर उपयोग काय परिचयाचा!"

"तुम्हाला वाटत असेल तसं–पण मला वाटतं की तुम्ही फार करताहात माझ्यासाठी ! मनापासून–आपुलकीनं–कुणीही केलं नाही अन् करणार नाही एवढं!" सुधीर एकदम आवेगानं म्हणाला अन् मग जरा थांबून शांतपणे म्हणाला, "तुम्ही म्हणता खऱ्या की कुणीही केलं पाहिजे एवढं कुणासाठीही म्हणून–पण तुम्हाला अनुभव नाही अजून जगाचा! कदाचित् तुमच्यावर वेळही आली नसेल–परंतु मी मात्र साऱ्या वऱ्यावाईट अनुभवातून गेलोय–अन् म्हणूनच तुम्हाला म्हटलं की तुम्ही फार करताहात माझ्यासाठी म्हणून! तुम्ही दाखवताहात एवढी सहानुभूती–आपुलकी पूर्वीही कुणी दाखवतं तर. .तर...जाऊ दे झालं!"

रजनीच्या हृदयात कुठंतरी दडलेलं अनावर कुतूहल – औत्सुक्य अचानक जागं झालं. दुसरं म्हणजे प्राप्त परिस्थितीपासून सुधीरचं मनही दूर जायला हवं होतं. दोन्ही हेतूंची मनातल्या मनात रजनीनं सांगड घातली अन् ती मृदु स्वरात म्हणाली,

"विषय निघालाय म्हणून विचारतेय्. राग मानू नका हं! राहून राहून मला वाटतं कीं तुमच्यासारखा उच्च विचारांचा, सुसंस्कृत रहाणीचा, दिलदार स्वभावाचा, मध्यमवर्गीय तरुण–पण पण ह्या असल्या चोरी–मारी सारख्या अत्यंत हीन–घाणेरडया व्यवसायात कसा शिरला? शिक्षणाच्या अभावी की परिस्थितीच्या–"

रजनीचं वाक्य अर्ध्यावर तोडीत उपरोधिक स्वरात सुधीर म्हणाला,

"रजनीवाई, ग्रॅज्युएट नसलो तरी वी. ए. च्या परीक्षेला वसलेला आहे मी ! परंतु परीक्षेत यश आलं नाही–अन् इकडे परिस्थितीनं असं काही. "

"काय सांगताहात तरी काय? वी. ए.-ला ॲपीअर झाला होता तुम्ही?" आश्चर्याच्या धक्क्यातून सावरताच रजनीच्या तोंडातून प्रश्न निघून गेला–अन् दोन-चार क्षणांनी ती खिन्नपणे म्हणाली, "अन् एवढं शिक्षण पदरी असूनही तुम्ही हा मार्ग पत्करावा उपजीविकेसाठी, सुधीर?"

"पत्करला नाही. पत्करावा लागला रजनीवाई ! सारे मार्ग वंद झाले–त्यामुळं समोरच्या दिसेल त्या मार्गानं जाणं भागं पडलं–अजूनही सारं आठवलं की माझं काळीज कसं गलवलून जातं–वाटतं की आपलं दु:ख कधीतरी छातीचा कोट फोडून वाहेर उसळणार की काय म्हणून!"

"सुधीर, आपलं दु:ख तुम्ही मला नाही का सांगणार? सुख दुसऱ्याला सांगीतल्यानं वाढतं तसं दुसऱ्याला ऐकवल्यानं दु:ख कमी होतं !"

रजनीच्या प्रेमळ चेहऱ्याकडे अन् स्निग्ध–स्नहाळ डोळयात तेवणाऱ्या सहानुभूतीच्या दोन प्रसन्न ज्योतींकडे सुधीर क्षणभर पहात राहिला अन् मान हलवून कडवटपणे हसून म्हणाला,

"माझ्या दु:खाचा वाटा मागणाऱ्या तुम्ही पहिल्याच भेटताहात मला! सारं सांगायचं झालं तर मुळातूनच सुरवात करायला हवी. माझे वडील चांगल्या पगारावर नोकरीला होते–तेव्हाचं आमचं सुखी–स्वस्थ आयुष्य. माझे वाळपणाचे सौख्याचे दिवस मला कसे डोळयांपुढं दिसताहेत ! पण एखादं सुंदर स्वप्न अचानक जाग येऊन तुटावं तसं झालं ! माझ्या वडिलांच्या अकस्मात् मृत्यूनं आमच्यावर आक्षरश: आकाशंच कोसळलं. सर्वस्व हिरावलं गेलं–सर्वार्थानी ! मी तर तेव्हा ८–१० वर्षां-





अनुक्रमणिका








चाच होतो अन् माधवच्या वेळी आईला दिवस गेलेले होते! ती आपल्याच दुःखात चूर असताना निर्दय–निष्ठुर नातेवाईकांनी, शेजाऱ्यापाजाऱ्यांनी हात धुवून घेतले! चीज–वस्तू, दाग-दागिने, रोकड सारं लुटलं गेलं अन् आईच्या नशिबी वनवास आला हो अक्षरशः! ना सासर–माहेरचा म्हणावा तसा आधार –ना काही शिक्षण! शेवटी तिनं पदरात असलेल्या दोन पोरांसाठी प्रतिष्ठा, मानापमान बाजूला ठेवून तिला शक्य असलेलं एकमेव काम करणं सुरू केलं–लोकांच्या घरी भांडी–धुण्यापासून केर काढण्यापर्यंत तसंच स्वयंपाकपाण्याची कामं करायला तिनं कंबर कसली! दिवसातून १८–१९ तास कामं करायची ती–अन् तीही लोकांची घालूनपाडून बोलणी सहन करीत, अपमान मुकाट्यानं सोशीत! अन् एवढं करूनही जेमतेम उदरनिर्वाहापुरते पैसेही मिळणं कठीण–त्यातही लोक पैसे बुडवायचे!!! मग जोडीला शिवणकाम–वस्तू करून विकणं असं करून आई उत्पन्नाची-अन् खर्चाची तोंडमिळवणी कशीवशी करी! भविष्यावर नजर ठेवून, मुलांकडे पाहूनच ती केवळ जिवापाड कष्ट उपशीत होती–केवळ मुलांना चांगलं आयुष्य लाभावं यासाठी! सुदैवानं मला तिचे कष्ट दिसत होते–त्यामागची जिद्द अन् अपेक्षा समजत होती अन् त्यानुसार मीही वागत होतो. अभ्यासाव्यतिरिक्त दुसरं मला काही कळलं नाही. माझं सारं जग या खोलीच्या चार भिंतीत होतं! यथावकाश मी उत्तम प्रकारे गुण मिळवून मॅट्रिक पास झालो अन् आईचा आनंद गगनात मावेनासा झाला! ती मला कॉलेजात घालण्याच्या गोष्टी करू लागली तेव्हां मी माझा निर्धार प्रकट केला की "आई, मला आता पुढचं शिक्षण वगैरे काही नको. शॉर्टहॅंड–टायपिंग करून पब्लिक सर्व्हिस कमिशनची परीक्षा देऊन मी नोकरी धरणार! अग, तू तरी आता किती दिवस असे श्रम करायचे जिवापाड अन् मी ते नुसतेच पहायचे?" त्यावर

# आमच्या 'टकळी'ला प्रतिष्ठा होती



एक काळ असा होता
आमचा नेता खंबीर होता.
शस्त्रांवाचुन लढून आम्ही
देश, स्वतंत्र केला होता.
एक काळ असा होता
जगात आमचा मान होता
तेव्हां आमच्या मैत्रीसाठी
सारा मानव उत्सुक होता.
एक वेळ अशी होती
आमच्या 'टकळी'ला प्रतिष्ठा होती
तेव्हां आमची उक्ती, कृती,
जगाला आधार वाटत होती.
आज वेळ अशी आहे
आमची टकळी चालू आहे
साम्राज्यवादास विरोध आहे
तटस्थतेचे धोरण आहे.
रंगभेद मानणार नाही
कोणत्या गटात जाणार नाही
जगात युद्ध रहाणार नाही
हेच आमचे उद्दिष्ट आहे
आमची टकळी चालूच आहे.
आज वेळ अशी आहे
परदेशांवर भिस्त आहे
सत्तास्पर्धेमध्ये आमच्या
नेत्यांची शक्ती रावत आहे.

आज वेळ अशी आहे
आमचे नेते आमच्या साठी
जगात दौरे काढीत आहेत
आमच्यासाठी दूर देशात
कर्ज, भीक मागत आहेत
अन्न द्या! पैसा द्या।
अद्ययावत शस्त्रे द्या।
आधुनिक यंत्रे द्या।
यंत्रे, शस्त्रे, हाताळणारे
निष्णात तज्ञ, सुद्धा द्या।
आज वेळ अशी आहे
जग आम्हांला टाळीत आहे
तोंड देखलं कोरडं हसून
आमची बोळवण करीत आहे.
तरीसुद्धा अश्या वेळी
उच्च, उच्च, उच्चतर
घोषणांचा नारा आहे
आंतरराष्ट्र राजकारणात
आमची लुडबुड चालू आहे.
आज मात्र अशा वेळी
जगाला प्रश्न पडला आहे
आमच्या जवळ बडबडीशिवाय
बाकी शिल्लक काय आहे?

—दत्ता खरे

मला जवळ घेऊन कुरवाळीत, अश्रूभरल्या डोळ्यांनी ती म्हणाली होती, "सुधीर, माझे सारे श्रम तुझ्या या बोलण्यानं देखील नाहीसे होतात! अन् आता काय हत्ती जाऊन शेपूट राहिलंय्! मॅट्रिक काय कुणीही होतं आजकाल अन् आज जर नोकरी करायची म्हटलंस तर तुझ्या हुषारीवर कुठंही नोकरी मिळून जाईल तुला पण पण–जन्मभर कारकुनीच करीत रहावं लागेल–अन् तेच मला पसंत नाही! गेल्या ६–७ वर्षासारखी आणखी चार वर्षं काढली मी, तर तूं पदवीधर होशील अन् मग तुझ्या खांद्यावर माधवचा भार सोपवायला अन् आराम करायला मीही बिलकुल मागं–पुढं पहाणार नाही! सुधीर, तुम्हा दोघांनां खूप–खूप शिकवायची मोठी हौस होती रे तुझ्या वडिलांना! आईच्या म्हणण्यातला भव्य–दिव्य आशय ध्यानात आल्यावर मीही आपला हेका चालवला नाही! तिच्या म्हणण्यात काय





अनुक्रमणिका

खोटं होतं—आपल्या मुलांच्या जन्माच्या कल्याणाकडे तिची दृष्टी होती! कॉले-जात गेल्यावर आपण निदान शिकवण्या करून आईला हातभार लावावा असं माझ्या मनात होतं—परंतु आईला ते पटलं नाही! माझं म्हणणं धुडकावताना ती फक्त दोनच वाक्यं बोलली, पण—पण त्या दोन वाक्यांनी माझ्या हृदयाला हात घातला, "सुधीर—अरे आज तुमचे वडील हयात असते तर तुमच्यावर अशी पाळी येती का?—मग, मग, समजा की माझ्या-ऐवजी तेच हयात—" एवढंच म्हणून तिनं डोळ्यांना पदर लावला होता—माझे शब्द मी कायमचे मनातल्या मनात गाडून टाकले! तिच्या मनाला धक्का बसेल वा दुःख होईलसं यत्किंचितही कृत्य करायला माझी तयारी नव्हती! कॉलेजची तीन वर्षे व्यवस्थितपणे पार पडली—अन् अन् बहुधा सीनीयर बी. ए. च्या सुरवातीला आई आजारी पडली असावी—असावी म्हणतोय् कारण माझ्या लक्षात ते येई-पर्यंत आमची प्रीलीम जवळ आली होती! जवळजवळ सहासात महिने दुखणं अंगावर काढून ती नेहमीप्रमाणं कष्ट उपशीत होती! माझ्या लक्षात येताच मी तिला तावडतोब डॉक्टरांकडे नेलं—अन् अन् त्यांच्या तपासणीत बाहेर आलं की तो क्षय होता म्हणून!

"अग बाई—क्षय!!" रजनीचं सर्वांग शहारलं अन् तिच्या तोंडून भीतीवाचक उद्गार उमटले!

"पण त्यात अशक्य काय होतं? शरीराला कष्टांचा भार अन् मनाला काळजीचा, यामुळं दोन्हीही खंगली जाणं म्हणजे नवल नव्हतं. आपला रोज येणारा ताप, छातीत दुखणं मात्र तिनं आम्हा मुलांपास्नं मुद्दाम लपवून ठेवलं असलं पाहिजे! पण ते सारं उघडकीला आलं ते आटोक्यापलीकडे गेल्यावर! डॉक्टरांनी जवळजवळ सुचवलंच होतं की पेशंट काढील तेवढे दिवस काढील म्हणून! ते ऐकून माझा धीरच खचला—हातापायातलं त्राण नाहीसं झालं. सुखाचे दिवस आता दृष्टिक्षेपात आलेले होते—अन् ज्यासाठी जिनं तन-मनानं कष्ट केले ती आई मात्र क्षयाच्या तिसऱ्या अवस्थेत होती! सुख भोगायला, कौतुक करायला ती जवळ नसली तर सुखाची अन् यशाची काय किंमत होती? भलत्या विचारांनी मनाला चैन पडेनासं झालं—नाही म्हटलं तरी अभ्यासात मन लागेना! आईला जवळ जवळ सक्तीनं अंथरुणावर झोपवून ठेवलं होतं. बरं मी नोकरी करायची म्हटलं तर परीक्षा ३—४ महिन्यांवर आलेली ती तर हातची कशी घालवायची! अन् नाहीतर मधले दिवस कसे काढायचे? तोपर्यंतचे दिवस जेमतेम हातातोंडाची गाठ पडण्या-इतपत गेल्यानं गाठीला एक नया पैसाही नव्हता. त्यात पुनः आईला औषध—योजना व्यवस्थित, उत्तमरीत्या व्हायला हवी होती. अन् अशा अवस्थेत कर्जही कुठून मिळेना! अहो कर्ज मिळायला देखील काही पत लागतेच की—माझ्यासारख्या फाटक्या माणसाला कर्ज देणार तरी कोण? शेवटी मनाविरुद्ध आमच्या वस्तीतल्या मवा-ल्यांच्या म्होरक्याकडून व्याजाच्या चढ्या दरानं, ठराविक मुदतीच्या बोलीनं मोठी रक्कम काढली! औषधपाणी सुरू झालं—तिला थोडा आराम पडू लागला तसा मीही जोमानं अभ्यासाला लागलो. पुनः हुरूप वाटू लागला की परीक्षेतून एकदा चांगल्याप्रकारे पास झालो की सुटलो! कुठंतरी चांगली नोकरी लागली की हां हां म्हणता कर्ज फिटेल. आईची तब्येतही पुनः पहिल्यासारखी होईल वगैरे! पण रजनीबाई, मनुष्य चिंतित असतो एक अन् दैव मात्र खदखदा हसत काहीतरी भलतंच, विपरीत करून टाकतं याचा अनुभव मला त्यावेळेस आला! एके दिवशी संध्याकाळी घरातल्या घरात काही डबा काढण्याकरता म्हणून आई उंच स्टुलावर चढली होती ती भोवळ येऊन पडली अन् डोक्याला जबर मार लागला! मी बागेत अभ्यासाला गेलो होतो तिथं कुणीतरी येऊन ही बातमी सांगितली तसा मी धावतच सुटलो तिथनं. हॉस्पिटलात नेल्यावर सांगण्यात आलं की तिच्या मेंदूतून रक्तस्राव झाला असून त्यावरची अवघड शस्त्रक्रिया तावडतोब झाली पाहिजे म्हणून! अन् तशी शस्त्रक्रिया करू शक-णारा एकुलता एकच सर्जन होता इथं इथं त्यावेळी—"सुधीरनं रजनीकडे पाहिलं अन् शब्दांवर जोर देऊन तो पुढं तिर-स्काराच्या स्वरात म्हणाला, "तुम्हांला माहीत आहे तो डॉक्टररूपी पशू!—डॉ. नरवणे—तुमच्या पंपाचा जिवलग मित्र!"

"काय, नरवणेकाका?—अन् पशू—?"

"होय, होय! त्या सैतानानं दीड हजार रुपये माझ्या हातात पडतील तेव्हाच मी ऑपरेशन करण्यासाठी येईन म्हणून रोख-ठोक बजावलं मला—मध्यरात्री, भर बारा वाजता! एक एक क्षण मोलाचा होता! —दीड हजार रूपये काय तितके पैसेही नव्हते त्या घडीला मजजवळ — पंचप्राण गहाण ठेवूनही जरी मला पैसे मिळते तरी मी माझ्या आईसाठी तसं करायला मागं-पुढं पाहिलं नसतं! पण ते कुठं शक्य होतं?" डॉक्टरसाहेब तुम्ही आत्तांच्या आत्ता सुर-वात करा ऑपरेशनला, मी तुमचे पैसे वाटेल ते करून आणून देईन—मागे-पुढं" म्हणून त्याचे पाय धरून मी आक्रोश केला परंतु त्या पाषाणाला पाझर फुटला नाही! शेवटी पहाटेपर्यंत मागे कर्ज काढलं होतं त्याच मवाळ्याकडनं मी एक रकमी दीड हजार रुपये काढून डॉक्टर नरव-णेच्या पायाशी ठेवले तेव्हाच तो आपल्या पलंगावरून हलला!—पण पण मध्ये बराच काळ लोटल्यानं फार उशीर होऊन गेला

होता! ऑपरेशनची तयारी झाली खरी परंतु प्रत्यक्ष ऑपरेशन टेबलवर घेण्या-पूर्वीच माझी आई—आई मला अन् माधवला सोडून गेली! —"

रजनी सुन्न होऊन सारं ऐकत होती! नरवणेकाका — डॉ. नरवणे! तिच्या पपांचे जानी दोस्त! पूर्वी कितीदा यायचे त्यांच्या घरी—रजनीवर त्यांचं मुलीवर असावं तसं प्रेम होतं! स्वतःला मुलगी नसल्यानं तिला ते मुलीसारखंच मानीत जणू—त्यांच्या पैशाच्या लोभाबावत पपां-कडनं तिनं बरंच ऐकलं होतं तसं परंतु त्यांच्या लोभाची जात एवढी हीन-काळीकुट्ट असेलसं तिच्या स्वप्नातही नव्हतं! अन् त्यामुळंच सुधीरच्या तोंडून त्याच्या आईच्या हृदयद्रावक मृत्यूचं कथन ऐकून ती सुन्न होऊन गेली होती! एक प्रकारे त्या मृत्यूचं उत्तरदायित्वं डॉ. नरवण्यांच्याच डोक्यावर येत होतं अन् म्हणूनच—म्हणूनच ——

रजनीला अगदी अलिकडचा प्रसंग आठवला! २—३ महिन्यांपूर्वी रजनी—सुधीरसह कुठंतरी जाताना त्यांना वाटेत डॉ. नरवणे भेटले होते—कितीतरी दिवसांनी भेट झाल्यानं दहा—पंधरा मिनिटं रजनी त्यांच्याशी रस्त्यात बोलत उभी होती अन् सुधीर मात्र तिथं नुसतं उभं रहाण्याचं साधं सौजन्यही न दाखवता त्यांच्यापास्नं चक्क शंभर फुटांवर तिची वाट पहात उभा राहिला होता! डॉक्टरांनी मला दोन तीनदा कोण ग तो तुझ्याबरोबर होता म्हणून त्याची चौकशी केल्यानंतर तर तिला त्याचा तो रानटीपणा अधिकच खुपला होता —

परंतु त्यापाठचं मर्म तिच्या आज ध्यानात आलं होतं! त्या विचारासरशी रजनीनं भानावर येऊं सुधीरकडे पाहिलं तो सुधीर डोळे कोरडे करीत होता.

"सुधीर भूतकाळातल्या आठवणी विलक्षण क्लेशदायक असतात नाही! तुम्हाला माझ्या प्रश्नाचं उत्तर देण्यासाठी केवढ्या प्रसंगातून पुन:श्च जावं लागलं—"

"तुम्ही त्याबद्दल वाईट वाटून घेऊ नका—मी एवढं भोगलंय् की आठवणींनी होणारे क्लेश काहीच नव्हेत त्या मानानं! आईच्या मृत्यूनं मला अक्षरशः वेड्या-पिशासारखं झालं! तिचा मृत्यू घडला होता केवळ पैशाअभावी—वेळीच उपचार न झाल्यानं! माझं मलाच वाटू लागलं की आपलं जिणं निरर्थक आहे, व्यर्थ आहे! प्रत्यक्ष आईसाठीही आपल्याला काही करता आलं नाही या जाणीवेनं मन सैरभैर झालं! परंतु केवळ दोन गोष्टींमुळं मी माझं मन ताब्यात आणलं एक म्हणजे तिनं क्षयानं अंथरूण धरताच माझं अभ्यासा-वरचं लक्ष विचलित झाल्याचं पाहून तिनं मला वडीलांच्या नावानं शपथ घातली होती की काही झालं तरी मनःपूर्वक अभ्यास करून यावर्षी परीक्षेला बसलं पाहिजे म्हणून! अन् दुसरं म्हणजे त्याच सुमारास तिनं माधवचीही सारी जबाबदारी माझ्या-वर सोपवून टाकली होती! आईच्या मृत्यूनं निर्माण झालेली परिस्थिती कठीण होती, परंतु मी महत्प्रयासानं त्यावर ताबा मिळविला! तरीही अभ्यासाकडे मन लागत नव्हतं! कारण एकीकडे हे दुःख तर दुरीकडे माझ्या आईचाही घरादारा-वरचा वचका नाहीसा झाल्यानं त्या म्होर-

क्याचे हस्तक रोज घरी येऊन रस्त्यात गाठून पैशाची मागणी करू लागत होते–त्यांना थोपवता थोपवता माझ्या अक्षरशः नाकी नऊ येत होते ! माधव तेव्हा सारा ७-८ वर्षांचा होता–त्यामुळं त्याच्या प्रत्येक बाबतीत लक्ष घालावं लागत होतं ! अशाच अवस्थेत परीक्षा आली अन् होऊनही गेली ! केवळ आईनं घातलेल्या शपथेमुळं मला बसावं लागलं त्या परीक्षेला–अन्यथा काय होणार होतं ते माझं मलाही ठाऊक होतं ! शेवटचे दोन पेपर्स तर मी जवळ जवळ कोरेच दिले अक्षरशः ! अन् परीक्षेचं असं झाल्यामुळं माझी परिस्थिती अधिकच भयानक झाली होती ! आशेला कुठूनही जागा नाही. डोक्यावर प्रचंड कर्ज, अन् खांद्यावर माधवची जबाबदारी ! मी नोकरी पहायचे प्रयत्न करीत होतो–पण ना माझी कुठं ओळख, ना कुठं वशिला ! नोकरी न मिळाल्यानं जगायचं कसं हा प्रश्न होता–मग मवाल्यांच्या त्या म्होरक्याचं कर्ज फेडायची बातच सोडा ! अशा रीतीनं सर्व वाटा बंद होऊन परिस्थितीच्या चक्रव्यूहात मी घेरला गेलो असता त्या गुंडानं मला बोलावून घेतलं अन् परखड शब्दात दोन पर्याय माझ्यापुढं ठेवले. कर्ज फेडण्याची माझ्यात ऐपत नसल्यानं ते फिटेस्तो त्याच्या धंद्यात त्याचा मदतनीस-कम-हस्तक म्हणून काम करायला तयार व्हायचं वा उघड्या डोळ्यांनी माधवचं कमी जास्त झालेलं पहायचं–स्वतः अपंग होऊन भीक मागत उर्वरीत आयुष्य कंठायचं ! बस्स–विचार करून पर्याय स्वीकारायला अवघ्या २४ तासांचा अवधी उदारपणे दिला गेला होता ! ते चौवीस तास कसे चौवीस वर्षासारखे वाटले मला ! एका बाजूला आजवरचं सारं शिक्षण-संस्कार, आईवडिलांची पुण्याई, नावलौकिक पाय खेचीत होतं–अन दुसऱ्या बाजूला होता माधवचा–अन् माझ्या जीवन-मरणाचा प्रश्न ! काय स्वीकारायचं ! मी बोलून-चालून सामान्य माणूस–माझ्या जागी दुसरा कुणी सामान्य माणूस असता तर जसा वागला असता तसाच वागलो ! मनानं निश्चय केला की माधवचं आयुष्य बरबाद करायचा आपल्याला काय अधिकार आहे ? उलट पितृतुल्य वडील बंधू म्हणून त्याच्या आयुष्याला आकार देऊन त्याची सर्वांगसुंदर सद्गुणी मूर्ती बनवणं हे आईच्या मागचं आपलं कर्तव्य आहे ! आईनं सचोटीनं आपल्या मुलांची आयुष्यं घडवायचा अक्षरशः जिवापाड प्रयत्न केला, परंतु काय मिळवळं तिनं ? मग मी दुसऱ्या मार्गानं–जो सोपा आहे, निदान भासतोय्–का जाऊ नये ? नाही तरी या उलटच्या, निष्ठुर जगात सद्गुणांना, चांगुलपणाला, माणुसकीला काय किंमत वा अर्थ उरला आहे आज ? आपलं आयुष्याचं गणित चुकलंच आहे, पण निदान माधवच्या आयुष्याचं गणित तरी सोडवू आपण ! हातात पैसा असला तर त्याला चांगला शिकवू. मोठा करू सज्जन-सुसंस्कृत बनवू; म्हणजे कशा रीतीनं का होईना मातापितरांचं स्वप्नं निदान अर्धं तरी साकार होईल ! माझा निश्चय पक्का झाला अन् दुसऱ्या दिवशी माझ्या त्या दिवसापास्नं झालेल्या 'बॉस'ला मी तो कळवून टाकला !"

हृदयातल्या आगीनं जणू सारं पाणी आटल्यागत सुधीरचे डोळे कोरडे होते तरी रजनीच्या डोळ्यातून मात्र अश्रुधारा वाहू लागल्या होत्या ! तो क्षणभर श्वास घ्यायला थांबला अन् म्हणाला,

"अन् त्या क्षणापास्नं मी त्याच्या धंद्यात-व्यवसायात प्रवेश केला तो आजतागायत तिथं आहे. माझ्या मदतीचं-नोकरीचं चीज वा मोबदला म्हणून त्यांनी मला कपडालत्ता पुरवला अन् नियमितपणे ठराविक पैसेही हाती येऊ लागले ! निदान पोटापाण्याची काळजी दूर झाली ! अर्थात् एवढं कबूल करायला हवं तुमच्याजवळ की हा मार्ग जेवढा चोखाळायला सोपा वाटला तेवढा सोपा मात्र निश्चित नाही ! बेदरकार व्हायचं म्हटलं, बेफिकीर बनायचं म्हटलं तरी माणसाच्या मनावरचे संस्कार त्याला कधी तसं बनू देत नाहीत हेच खरं ! कुणी विश्वास ठेवू दे वा नको, परंतु माझ्या मातेच्या स्मृतीला साक्ष ठेवून मी सांगतो की मी गुन्हेगारीच्या जगात वावरत असलो तरी मनानं मात्र गुन्हेगार नाही, नाही; त्रिवार नाही ! व्यसनांपास्नं मी अलिप्त राहू शकलो–सद्विचार माझ्या मनातून दूर जाऊ शकले नाहीत ! जेव्हा नाईलाजाने, वैतागानं मला ह्या व्यवसायात शिरावं लागलं तेव्हा ह्या व्यवसायालाच पूर्णपणे आपला मानायचं ठरवलं होतं खरं मी, पण मला ते जमलं नाही, जमतही नाही ! काळजाच्या एका कोपऱ्यात सारखी अपराधाची टोचणी लागून राहिल्येय् ! सारासार विचार, विवेक, सद्सद्विवेक बुद्धी मला कधी कधी किती विचित्रपणे वागायला लावतात ते प्रत्यक्ष तुम्हीही जाणताहात रजनीबाई, त्या साखळी प्रकरणापास्नं ! अन् मुख्य म्हणजे माधवला याबाबत अवाक्षरही ठाऊक नाही ! माधवला यांतलं अवाक्षर कळवता कामा नये एवढंच मी 'बॉस'ला विनवलं होतं–त्यानंही सुदैवानं मानलं ! माधवला हे कळून त्याच्या मनातली मोठ्या भावाची प्रतिमा या वयातच डागळली जाऊ नये एवढी एकच मनीषा आहे माझी बस् ! त्याहून मला काही नको !"

"सुधीर किती वर्षे काम करताहात तुम्ही तुमच्या 'बॉस'बरोबर ?" सुधीर बोलायचा थांबल्यावर रजनीनं सहेतूक, निश्चयी स्वरात प्रश्न केला !

"का ? जवळ जवळ साडे-चार वर्षे होतील !" त्यानं आश्चर्यानं म्हटलं.

"मग अजूनही तुमचं कर्ज फिटलं कसं नाही ? मला वाटतं ते कधीच फिटलं असेल ! अन् तरीही अजून तुम्ही या व्यवसायाला चिकटून–"

"तुमच्या म्हणण्याचा रोख आला माझ्या ध्यानात, रजनीबाई," सुधीर मधेच किंचित् स्मितपूर्वक म्हणाला, परंतु दुसऱ्याच क्षणी त्याचा चेहरा गंभीर झाला. कसं सांगावं, काय बोलावं यासाठी जणू क्षणभर थांबून

अनुक्रमणिका

रजनीच्या नजरेला नजर देऊन तो संथ, ठाशीव सुरात म्हणाला, "आपलं कर्ज फिटलं की आपण सहज बाजूला होऊ शकू या घाणेरड्या व्यवसायातून असं मलाही सुरवातीला वाटलं होतं; परंतु मागाहून समजून चुकलं की या चक्रव्यूहात शिरणं सोपं असलं तरी बाहेर पडणं कठीण आहे. फार कठीण आहे म्हणून. 'बॉस'चा हस्तक म्हणून वावरत असताना काही भानगडीत गुंतलो–सापडलो–पकडलो गेलो तरी पैसा-अन्-ओळख यांच्या बळावर त्यानं 'आपला माणूस' म्हणून सहीसलामत सोडवलं होतं, इतरांप्रमाणं मलाही ! मग तुम्हीच सांगा, त्याला सोडून जर आता बाहेर पडलो तर गुन्हेगार नसतानाही, पूर्वीप्रमाणं परंतु उलट मार्गानं तो मला अगदी सहजगत्या एखाद्या प्रकरणात–तेही पूर्वीचंच असू शकेल–एखादं दडपलं गेलेलं असं–अडकवू शकेल की नाही ? शकेल की नाही नको, दोन वर्षांपूर्वी माझे पैसे फिटायच्या बेतात आले असता त्यानं मला सरळ-सरळ अगदी प्रच्छन्न धमकी दिली. अन् माझ्या ध्यानात आलं की या चक्रव्यूहातून आपल्याला सुटका नाही ! माझ्या बॉस सारख्या संघटित गुन्हेगाराचे अगदी हवालदारा-पासून पोलिस-सुपरिटेंडेंटपर्यंत अन् वकीला-पासून न्यायाधीशांपर्यंत माणसं पैशानं कशी बांधलेली आहेत–त्यामुळं आपलं काहीही करणं त्याला शक्य आहे ! तेव्हा सुखानं जगायचं असेल, नव्हे जिवंत रहायचं असेल, तर आहे तेच चालू ठेवलं पाहिजे ! अन् निदान माधवचं शिक्षण पुरं होऊन तो मिळवू लागेपर्यंत, आपल्या मोठ्या भावाला 'समजून' घेऊन त्याच्या पाठीशी उभा राहण्याइतका तो मोठा होईपर्यंत मला असहायपणे ह्याच मार्गानं उपजीविका केली पाहिजे ! एकदा ही जबाबदारी संपली की मी ह्या चक्रव्यूहातून प्राणांचीही बाजी लावून बाहेर पडेन ! रजनीबाई, सत्य कठोर असतं–पण आहे ते असं आहे– ! तुम्ही विचारलंतच तेव्हा तुम्हांला सांगायला हरकत नाही–ते पूर्वीचं जाऊ दे–अगदी हल्लीही माझ्या पाठचा छळ धाक-दपटशा चुकलेला नाही !"

"काय म्हणता तरी काय ?"

रजनीच्या आवाजातल्या सहानुभूतीनं सुधीरचा आवाज दाटून आला,

"हा धाकटा भाऊ माधव, केवळ ज्याच्यासाठी मी सारं सहन केलं, कुणाचीही पर्वा केली नाही अन् उपजीविकेसाठी गुन्हेगारीचा मार्ग पत्करला, तोच असा अत्यवस्थ होऊन मृत्यूच्या दारी पडला असता मला कसं शक्य आहे त्याला टाकून बॉसच्या कामगिऱ्या पार पाडणं ? परंतु त्या चांडाळांना कसलं आलंय मन–हृदय वा भावना ! डोळ्यांनी सारं पाहूनही मला धमक्या देतात–की वाटेल ते करून आमची कामगिरी पार पाडली नाहीस तर काय करू बघ ! कसं बसं थोपवून धरलंय्–फार काय आता औषध आणायला बाहेर गेलो तेव्हांही एका साथीदारानं गाठून सांगतलीच नेहमीची धमकी ! सांगा–आता तुम्हीच सांगा, माझ्यासारख्या एकाकी असहाय माणसानं सारं कुठवर म्हणून सहन करायचं ? ज्याच्यासाठी सहन केलं आजवर तोही आज–आज सोडून तर...!" पुढचे शब्द त्याला बोलवेनात–अन् त्यानं एकदम दोन्ही हातांनी आपला चेहरा आवेगानं झाकून घेतला.

रजनीच्या मनात भावनांचं तुफान उठल्यासारखं झालं–जे कित्येक दिवस असं अचानकपणे तिचं अंतःकरण व्यापून टाकीत असे ! तिला वाटलं की आज–अन् केवळ आजच भावनांच्या ऊर्मी बोलून टाकल्या पाहिजेत– ! क्षणभर डोळे मिटून तिनं निश्चय केला. ती हलकेच सुधीरच्या जवळ सरकली अन् आपल्या हातांनी सुधीरचे चेहरा झाकणारे हात दूर करीत मृदु, मधुर शब्दात म्हणाली,

"–पण पण ह्या हातांचा सहारा तुला लाभला तर, सुधीर ?–बघ ना, –मग तरी तुला ह्या चक्रव्यूहातून बाहेर पडता येईल की नाही ?"

एक क्षण अधांतरी लटकला–परंतु पुढच्या क्षणाला तिच्या शब्दांचा अर्थ सुधीरच्या अंतर्मनापर्यंत जाऊन पोहोचला. त्यासरशी झटक्यानं तिच्या हातातून आपले हात सोडवून घेत तो व्याकुळ, भयचकीत स्वरात म्हणाला,

"छे ! छे !!–भलतंच काही तरी ! रजनी, हे तुझे नाजूक हात कुणाला खाच-खळग्यातून मार्ग दाखविताना आधार देण्यासाठी नाहीत तर त्या हातांना कुणातरी समर्थ बाहूंनी आधार द्यायला हवा–सुखाच्या पायघड्यांवरून अलगदपणे चालवण्यासाठी !–" अन् आपण तिचा एकेरी उल्लेख केल्याचं ध्यानात येताच एकदम गोंधळून स्तब्ध झाला !

"पण-पण कां ?"



अनुक्रमणिका








"का? – हं–तुला–मला दोघांनाही ठाऊक आहे! सोन्याच्या कोंदणाला शोभेलसा हिरा बसवावा लागतो, रजनी; कोळसा नव्हे!"

"परंतु सुधीर, हिराही कोळशाच्या खाणीतच सापडतो!–अन् मी जो शोधून काढलाय् तोही हिराच आहे!–लाखात एक!!

"रजनी!–"

"सुधीर, मी थट्टा करीत नाही तुझी, खरं तेच सांगतेय्!–कुणालाही हेच सांगेन! फक्त तू आता एका प्रश्नाचं उत्तर दे खरंखुरं –मी–मी केवळ श्रीमंत बापाची मुलगी आहे–शिकलेली आहे, एवढ्यासाठीच का तू मगाशी माझ्या प्रेमाला उद्देशून म्हणालास की 'छे! छे!! भलतंच काहीतरी!' श्रीमंत बापाच्या मुलीला मन नसतं–भावना नसतात–प्रेम तर करताच येत नाही असं तुला वाटतं का?–"

"प्लीज, रजनी, प्लीज! मला समजून घे!! माझ्या शब्दांचा अर्थ तू समजतेस तसा नव्हता! तसं म्हणून मी तुझ्या भावनांचा अपमान करणार नाही! तुझ्या दृष्टीनं तुझ्या भावना सत्य असतील, पण माझ्या दृष्टीत ते केवळ स्वप्न होतं–अन् म्हणूनच तुझ्या अनपेक्षित शब्दांनी मी चमकलो, काही तरी चुकल्यासारखं वाटू लागलं! स्वप्नं असतात ती सत्य सृष्टीत कधीच उतरू शकत नाहीत–अन् उतरू लागली तर भंग पावतात! 'तुझं प्रेम' ही बाबही माझ्या दृष्टीनं एक उत्कट भव्य दिव्य स्वप्नच होतं–कधी सत्यसृष्टीत उतरेलसं वाटलं नव्हतं! तू ते करू पाहतेयस् रजनी–पण वाटतंय् तेवढं सोपं नाही ते! पर्वतशिखरावरून पाहिलं तर साधा निर्झरही मन आकर्षून घेतो–पण त्याची ओढ वाटून त्याच्या जवळ जायचं म्हटलं तर हातपाय मोडून घ्यावे लागतात–धोका पत्करावा लागतो! तुझ्यात अन् माझ्यात असंच पर्वतशिखर अन् खोल दरी एवढं अंतर आहे! ते अंतर तोडायचा प्रयत्न करण्यापूर्वी फिरून एकवार–

"साऱ्या गोष्टींचा विचार केलाय् मी! माझा निर्णय पक्का आहे–त्यापास्नं परावृत्त करण्याचं सामर्थ्य कुणातही नाही! माझं प्रेम तुझ्या दृष्टीनं स्वप्न असलं तरी ते सत्य आहे. अन् सत्य कधीही दुबळं, भित्रं नसतं. मी कदाचित् दुबळी असेन, सुधीर; परंतु माझं प्रेम खास दुबळं नाही. उलट त्यानं मला शक्ती दिल्येय् नवी. अन् त्याच शक्तीचे पंख लावून मी तू आपल्यामधल्या, ज्या काही तुला वाटणाऱ्या सामाजिक अंतराची भीती दाखवतोयस् ते अंतर अलगद कापून तुझ्यापाशी येणार आहे–आले आहे!" अन् आपले हात थोडेसे पुढं करीत, मान झुकवून रजनी दाटल्या स्वरानं म्हणाली, "सुधीर, तुझ्यासाठी म्हणून मी हात पुढं केले आहेत. त्यांना आपलं म्हणणं वा दूर लोटणं आता तुझ्याच हाती!!!"

दुसऱ्या क्षणी रजनीचे हात आवेगानं पकडून आपल्या हृदयाशी घट्ट धरून ठेवीत सुधीर उद्गारला,

"या माझ्या हातांचं भाग्य एवढं थोर असेलसं मला कधी वाटलंही नव्हतं!!!"

* *

"ठण्!" म्हणून घड्याळात ठोका पडला तशी रजनीनं निबंधांच्या वह्यांमधनं डोकं वर काढून घड्याळाकडे पाहिलं. साडेचार वाजले होते–म्हणजे शाळा सुटायला तासभर अवकाश होता. रजनीला शेवटचे दोन पीरीअडस् ऑफ होते. त्यामुळं तिनं लौकरच निघून सुधीरकडे जायचा विचार केला होता खरा पहिल्यांदा, परंतु मागाहून तिचं तिला वाटलं होतं की अशी घाई करता कामा नये, कुणाच्या डोळ्यांवर येईलसं वागता कामा नये म्हणून. घरीच लौकर जायचं असतं तर चाललं असतं पण सुधीरकडे जाण्यासाठी म्हणून शाळेतून लौकर बाहेर पडलो असं व्हायला नको या विचारानं तिनं तो बेत रद्द केला होता अन् मग ती निबंधाच्या वह्या पुढं घेऊन बसली होती!

काल रात्री मनातल्या भावना सुधीरजवळ स्पष्टपणे बोलून–सांगून टाकल्यावर–अन् इतक्या दिवसांवरचं मनावरचं दडपण उतरून टाकल्यावर तिला कसं हलकं–हलकं वाटलं होतं–अन् सुधीरनं तिच्या प्रीतीच्या केलेल्या स्वीकारानं मोकळेपणाची ती भावना किती सुखद ठरली होती! 'आपल्या खांद्यांवरली, मनावरली जबाबदारी या क्षणापास्नं वाढली आहे' हे उमजूनही तिला हायसं वाटलं होतं. निश्चित वाटलं होतं. आपले हात सुधीरच्या हातांच्या घट्ट पकडीत तसेच गुंतवून ठेवून तीही त्याच्यासारखीच भाव-समाधीत गुंगून गेली होती. स्वतःला हरवून गेली होती—

शब्दांविना नजरांचा तो अपूर्व संवाद किती वेळ चालला होता कुणास ठाऊक परंतु त्या विलक्षण समाधीतून प्रथम रजनी भानावर आली अन् पृथ्वीवर पाय लागताच माधवच्या विचारानं तिला इतकं काही चमत्कारीक वाटलं–शरमिंदं झाल्यासारखं वाटलं की सुधीरच्या हातातून आपले हात हलकेच सोडवून घेत ती चटकन् उठली–त्यासरशी सुधीरही भानावर आला. परंतु तत्पूर्वीच रजनी माधवच्या कॉटजवळ जाऊन पोहोचली होती–तिनं हलक्या हातांनी पांघरूण दूर केलं अन् त्याच्या अंगाला हात लावून पाहिला–तो –तो त्याचं सर्वांग घामानं नुसतं थबथबलं होतं.

रजनीच्या डोळ्यात अश्रू तरारले. जवळ आलेल्या सुधीरचा दंड धरून त्याला हलवीत ती एवढंच बोलू शकली होती–

"सुधीर–सुधीर, आपल्या माधवचा ताप उतरला बघ!"

अन् त्या शुभ-वर्तमानानं दोघांच्याही उत्साहाला उधाण आलं होतं! माधवला मागाहून थर्मामीटर लावून पाहिल्यावर सुधीर तृप्त स्वरात म्हणाला होता,

"आज पहाटेबरोबरच माझ्या जीवनातही दुःखाची रात्र संपून सुखाची–आनंदाची पहाट उगवणारसं वाटू लागलंय्!"

त्याच्या जीवनात खरोखरच नवीन पर्व सुरू झाल्यागत होतं. माधवची आशा त्यानं कधीच सोडली होती–डॉक्टरांना आशा नाही हे त्याला कळून चुकलंच होतं अन् तरीही माधव परिस्थितीवर मात करून सुखरूप होता. त्याला रजनीचे शब्द आठवले होते.

"नाही तरी आपल्या हातात शेवटी काय आहे?—सर्वशक्तिमान परमेश्वरावर हवाला टाकून आपण काय ते करीत रहायचं !"

अन् परमेश्वराच्या ठायी त्याच्या मनात नवविश्वास, श्रद्धा उत्पन्न झाली होती ! त्यानं श्रद्धेनं परमेश्वराची मनोमन करुणा भाकलीच होती अन् रजनीचा हात हातात घेऊन नवा निश्चय केला होता,

"या क्षणापास्नं जुने उद्योग सोडून हिमतीनं नवं जीवन जगायचं—नवा मार्ग चोखाळायचं ठरवलं आहे परमेश्वरा ! माझ्या प्रयत्नात मला यश दे !!"

आठाच्या सुमारास डॉक्टर येऊन, माधवच्या प्रकृतीबद्दल समाधान व्यक्त करून गेल्यावर रजनीला सुधीरचा निरोप घेणं किती जड गेलं होतं ! त्यालाही तसंच झालं होतं परंतु विवेकानं "तुझ्या घरची माणसं काही झाली तरी वाट पहात असतील !" म्हणून त्यानं तिला लौकर बाहेर पडायला उद्युक्त केलं होतं—अन् शेवटी संध्याकाळी शाळा सुटल्यावर लगेच इकडे यायचं असं दोघांचं ठरलं होतं अन् दहादा मागं वळून पहात, सुधीरला निरोपादाखल हात दाखवीत रजनी हर्षोत्फुल्ल मनानं घरच्या वाटेला लागली होती.

त्यानुसार रजनी शाळा सुटायची वाट पहात निबंध तपासत बसली होती. साडे-चारचा ठोका पडल्यावर घड्याळाकडे एकवार दृष्टिक्षेप टाकून तिनं पुनः पुढ्यातल्या वह्यात लक्ष घातलं. दहा मिनिटं तशीच गेली—अन् शिपाई आत येऊन म्हणाला,

"आपटेबाई, तुमच्या पपांचा फोन आलाय् !"

"पपांचा फोन ?" रजनी आश्चर्यचकीत होऊनच उठली होती. प्रिन्सिपॉलांच्या रूममध्ये जाईस्तो ती हाच विचार करीत होती की पपा आले तरी कधी अन् मुद्दाम कधी नव्हे तो शाळेत फोन करायचं कारण तरी काय ?

"हॅलो पपा, मी रजनी बोलतेय्. तुम्ही केव्हा आलात दिल्लीहून ?"

"झाला एक तासभर." पपांचा आवाज रजनीला चमत्कारिक वाटला—किंचित् रुक्ष. त्याच आवाजात ते पुढं म्हणाले, "रजनी, आत्ता क्लास आहे तुला ?"

"अं—नाही. दोन पिरीअडस् ऑफ होते म्हणून वह्या तपासतेय् मुलांच्या !"

"मग उत्तमच. लौकर घरी ये तावडतोब—"

"पण—पण—कशाला ?" शाळा सुटल्यावर आपणाला लगेच सुधीरकडे जायचंय् म्हणून रजनीच्या लक्षात आलं.

"मी सांगतोय् म्हणून—माझं काम आहे तुझ्याशी ! तुझ्या प्रिन्सिपॉलना मी सांगायला हवं का तुलाही देतील परवानगी ?"

"तुम्ही सांगायची जरूर नाही—मी येतेच लगेच !"

टॅक्सीत बसल्या-बसल्याही रजनी पपांच्या तातडीच्या फोनचा—त्यांच्या रुक्ष-कठोर स्वराचा अन् तावडतोब घरी बोलावण्याचा मेळ घालीत होती. तिला पक्कं वाटत होतं की या साऱ्या घटनांमागं निश्चित् आनंदभैय्या आहे. पपा दिल्लीहून थकून-भागून घरी येताक्षणीच भैय्यानं त्यांना काहीतरी सगून चियावलं असलं पाहिजे. आपल्या नादान भावाचा स्वभाव ती पूर्णपणे ओळखून होती अन् त्यांत पुनः सकाळीच घडलेला तो प्रसंग !!!—

सुधीरचा निरोप घेऊन घरी आल्यावर ती आपल्या खोलीचं दार उघडून आत शिरली होती—अन् चकीत होऊन पहातच राहिली होती. आनंदभैय्या तिच्या पलंगावर तक्क्याला पाठ टेकून आरामात पाय सोडून सिगारेट ओढीत बसला होता. तिला पहाताक्षणीच तो उठून उभा राहिला अन् सिगारेटचं थोटूक पायाखाली चुरडीत त्यानं हसत हसत विचारलं,

"काय ताईसाहेब, तुमची रात्र आत्ता उजाडली वाटतं ? होता तरी कुठं रात्रभर आम्हा सगळ्यांना काळजीत टाकून ?"

त्याच्याकडे अन् त्याच्या खोचक-बोचक प्रश्नांकडे दुर्लक्ष करून रजनीनं आपली पर्स टेबलावर ठेवली अन् दोरीवरले कपडे काढून घेऊन ती आंघोळीला जाण्यासाठी वळली तो आनंदभैय्या दारात वाट अडवून उभा.

"भैय्या, दूर हो—मला आंघोळीला उशीर होतोय् !"



डॉक्टरांनी जिना चढा-उतरायला बंदी केलीय्

"मग जरा लवकर उगवायचं होतं घरी ! रजनी, अन् माझ्या प्रश्नांची उत्तरं दिली नाहीस तू अजून !"

"त्याबाबत तुझ्याशी एक शब्दही बोलण्याची माझी इच्छा नाही. समजलं ?" रजनीच्या ठाम उत्तरावर हेटाळणीचा स्वर काढून दात विचकीत तो म्हणाला होता,

"इच्छा नाही की बोलायला तोंडच नाही ? कुठल्या तोंडानं सांगणार आहेस सख्ख्या भावाला की मी रात्रभर एका मवाल्याच्या घरी–"

"भैय्या !" रजनी ओरडली होती, "पपांचा मुलगा असलास तरी जग तुला मवाली म्हणूनच ओळखतं ! निदान पाठच्या बहिणीशी वागताना तरी सभ्यतेच्या मर्यादा पाळीत जा !"

"हं ! घराण्याची अब्रू वेशीवर टांगायला निघालेल्या तुझ्यासारख्या निर्लज्ज मुलीनं सभ्यतेच्या गोष्टी करणं शोभत नाही रजनी !"

"भैय्या, तोंड आवर ! वडील भाऊ म्हणून तुझा मान राखलाय्–या क्षणापर्यंत–स्वतःचा अपमान करून घेऊ नकोस !" म्हणून रजनीनं त्वेषानं त्याला दूर ढकललं होतं अन् ती तिथून निसटली होती !

अन् त्या प्रसंगामुळंच तिला वाटत होतं की पपा यायची वाटच पहात बसलेल्या भैय्यानं संधी साधली असली पाहिजे म्हणून !

ही जाणीव होताक्षणीच तिच्या मनाचा क्षणभर थरकाप उडाला. खरं म्हणजे तिच्या अपेक्षेप्रमाणं दोन दिवसांनी पपा घरी येणार होते. ते आल्यावर त्यांचा मूड पाहून ती आपल्या प्रेमाबद्दल सारं त्यांना सांगणार होती. परंतु आता भलतंच झालं होतं–भैय्यानं नाही नाही ते सांगून, खऱ्या-खोटया गोष्टींची गल्लत करून क्षुल्लक बाबींना पदरचा भडक रंग फासून पपांचं मन पूर्णपणे कलुषित करून ठेवलं असण्याचा दाट संभव होता. अन् एकदा का पपांच्या मनानं काही घेतलं की–की मग निकालच लागला ! पपांचा हेकट, हट्टी अन् तापट स्वभाव तिला ठाऊक होता अन् ती भीत होती ती त्याच गोष्टीला—

परंतु क्षणभरच ! दुसऱ्याच क्षणी ती पपांशीही सामना द्यायला खंबीरपणे तयार झाली ! आयुष्यातला पहिला अन् कदाचित् शेवटचाही ! असेल पपांचा स्वभाव हेकट अन् नसेल त्यांना आपलं सुधीरवरचं प्रेम पसंत–पण म्हणून आपल्याला घाबरायला काय झालं ? आपल्या जीवनाचा मार्ग ठरवायचा अधिकार आपल्याला एकटयालाच कां म्हणून नसावा ? या विचारानं तिच्या मनाला भारलं अन् शांत मनानं खंबीरपणे पावलं टाकीत ती आपल्या बंगल्याच्या पायऱ्या चढली.

"माझ्या बेडरूममध्ये तुझी वाट पहातोय्–पपा' ही टेबलावरची चिठी तिनं चुरगळून बाहेर टाकली. पर्समधल्या किल्लीनं कपाट उघडून तिनं चोरकप्प्यात ठेवलेली आईची 'ती' साखळी बाहेर काढली. साखळी गळयात घालून तिनं भिंतीवर टांगलेल्या आईच्या फोटोला मनोमन श्रद्धेने–आशीर्वादाच्या अपेक्षेनं नमस्कार केला अन् दार लोटून ती हलक्या पावलांनी खोलीच्या बाहेर पडली अन् जिन्याकडे वळली.

पपांच्या बेडरूमचं दार बंद होतं. तिनं खिडकीवरल्या जाळीदार पडद्यांमधून आत दृष्टिक्षेप टाकला अन् ओझरत्या दृष्टिक्षेपात तिला आढळलं की पपा जोराजोरानं खोलीभर येरझारा करीत असून पलंगावर आनंदभैय्या बसला आहे. विचारमग्न असताना येरझारा घालायची पपांची पद्धत तिला माहीत होती. क्षणभर तिनं दाताखाली ओठ दाबून धरला अन् मग हसरा चेहरा करून तिनं बंद दार जोरानं लोटून आत पाऊल टाकलं.

"पपा–तुम्ही कसे लौकर आलात दिल्लीहून ? तुमचा फोन म्हणून शिपाई सांगत आला तेव्हा मला प्रथम खरंच वाटलं नाही ! तब्येत तर बरी आहे ना ?"

"कशी दिसतेय ! छान् आहे ना ?" पपा उसनं हसले पण लगेच त्यांचा चेहरा गंभीर झाला. रजनीला पलंगावर बसायची खूण करीत ते आवाजात सहजता आणायचा व्यर्थ प्रयत्न करीत म्हणाले, "तब्येतीवरून बरी आठवण झाली ! काय म्हणतोय तुझा तो 'सीरियस' असलेला विद्यार्थी ?"

त्यांचा रोख रजनीच्या ध्यानात आला. फापटपसारा लावण्यापेक्षा चटकन् मुद्यावर आलेलं बरं या विचारानं ती उत्तरली,

"कां ? तुम्हांला आनंदभैय्यानं 'फुल् रिपोर्ट' दिला नाही वाटतं ?"

तिच्या उत्तरानं पपा चमकले, अन् फेऱ्या मारता मारता थांबून तिच्याकडे रोखून पहात म्हणाले,

"रजनी, माझ्या प्रश्नाचं हे खरं उत्तर नव्हे !"

"अन् पपा तुमचा तो प्रश्नही खरा नव्हता ! तुम्हीही तुमच्या मनातले खरे प्रश्न स्पष्टपणे विचारा पपा म्हणजे मी त्यांची खरीखरी उत्तरं देईन !"

आपल्या लेकीच्या उत्तरातला निश्चय पपांना जाणवला अन् क्षणभर ते चकित होऊन खाली मान घालून समोर बसलेल्या रजनीच्या तरुण, सुंदर मूर्तीकडे पहातच उभे राहिले, परंतु लगेच त्यांचा सारा मनस्ताप उफाळून वर आला. आवेशानं त्यांनी टेबलाजवळची खुर्ची रजनीसमोर ओढून घेतली अन् त्यात बसता-बसता ते रागानं म्हणाले,

"ठीक आहे ! मग सांगून टाक–त्या त्या भामटयाचा–"

"पपा प्लीज !" त्यांना अडवीत रजनी म्हणाली. त्यांचं नाव सुधीर मेहेंदळे आहे–त्याला भामटा म्हणायचा कुणाला अधिकार नाही. पपा ! हा त्याचा फोटो–तुम्हांला मुद्दाम दाखवून ठेवलाय् !" म्हणून रजनीनं शांतपणे एक छोटया आकाराचा फोटो पपांच्या पुढयात टाकला. त्यातल्या देखण्या चेहऱ्याकडे पपा क्षणभर पहात राहिले अन् अर्धवट स्वतःशी, अर्धवट उघड पुटपुटले,

"Quite a good-looking smart fellow, I must admit !" मग त्यांनी रजनीकडे रोखून पहात विचारलं, "रजनी,

खरं सांग, या माणसाचे अन् तुझे संबंध कुठल्या थराला जाऊन पोहोचलेयत् ?"

"पपा !" रजनीनं प्रयत्न करूनही तिचा आवाज उंचावल्याविना राहिला नाही, "तुम्ही हा प्रश्न विचारणं म्हणजे एक प्रकारे माझा अपमान–"

"हा प्रश्न तुझ्याच मानापमानाचा राहिलेला नाही रजनी," पपा मध्येच तीव्र स्वरात म्हणाले, "तर माझ्या अब्रूचा, प्रतिष्ठेचा हा प्रश्न आहे ! आनंदाकडून तुझ्या ह्या तथाकथित प्रियकराबद्दल जेव्हा सारं काही कळलं तेव्हापास्नं मी विचार करतोय् की माझ्या रजनीसारख्या सुशिक्षित, सुंदर, शिकलेल्या मुलीनं एवढं भाळून जाण्यासारखं आहे तरी काय या माणसात ? ना शिक्षण, ना पैसा; बरं उद्योगधंदा म्हणावा तर सारं कर्तृत्व काय ते गुंडगिरीत; घरदाराचा नाही ठिकाणा ना कुणी नातेवाईक. पण हा फोटो पहाताक्षणीच लक्षात आलं की केवळ ह्या देखण्या चेहऱ्याच्या आकर्षणानंच तू त्याच्याकडे ओढली गेली असली पाहिजेस !–"

"पपा, तुम्ही निष्कारण गैरसमज करून घेतलाहात काहीतरी !" रजनी मधेच खुलासा करीत म्हणाली, "नुस्त्या चेहऱ्यावर भाळले असते पपा, तर असे अनेक तरुण सापडले असते मला ! कॉलेजात–बाहेर, कुठंही ! तुम्हांला आठवतंय् पपा, २-३ वर्षांपूर्वी आनंदभैय्याच्या आपल्या घरी विनाकारण येणाऱ्या मित्रांची संख्या अशी काही वाढली होती की त्याचं आपल्या घरी होणारं वागणं असह्य होऊन मी तुम्हांला त्यांचा बंदोबस्त करायला लावला होता. भैय्याचे ते सारे मित्र दिसायला गुलजार होते, छानछोकी-अद्यावत् कपडे घालीत होते. घरी कुणाचाच दाब नसल्यानं हवे तसे पैसे उधळीत होते अन् टोळक्यांनी जमून मोक्याच्या ठिकाणी मुली-बाळींची टिंगल करण्याखेरीज काही उद्योगही करीत नव्हते. असं असूनही त्यांच्यापैकी कुणी माझ्या मनात कां भरला नाही ? पपा, सुधीरबाबत तुमचं म्हणणं काही असो, पण फक्त माझ्यापुरतं सांगायचं झालं तर मी त्याच्या इतर कोणत्याही बाजूकडे लक्ष न देता केवळ त्याच्या गुणांवर, स्वभावावर प्रेम केलं !"

पपा हसले–उपहासानं हसले.

"एखाद्या गुंडामधे गुण बघणं म्हणजे–"

"पपा," रजनी मधेच तीव्र स्वरात म्हणाली, "तुम्ही सुधीरला गुंड-गुंड म्हणून कां हिणवता ? परिस्थितीनं मनुष्यावर उपजीविकेसाठी, जगण्यासाठी काहीही करायची पाळी येते ह्याचा तुम्हांला नसेल अनुभव आलेला; परंतु म्हणून काय कुणावर अशी पाळी आली नसेल म्हणून तुम्ही गृहीत धरावं ? सध्याच्या परिस्थितीत सुधीरचे उद्योग काय आहेत हे तुम्हांला ठाऊक आहे, पण ते तसेच कां आहेत हे तुम्हांला ठाऊक आहे ? का माझ्याजवळून जाणून घ्यायचा प्रयत्न तुम्ही केलाय् पपा ? चांगला, सच्छील मनुष्य परिस्थितीशी झगडून वाईटातून चांगलं काढायचा प्रयत्न करीतच असतो. पण त्याला जगानं संधीच दिली नाही तर त्यानं काय करावं ? तुम्ही त्याला गुंड-गुंड म्हणता पपा, पण एवढं लक्षात ठेवा की काही गुंडांसारखे भासणारे लोक खरोखरच सज्जन असतात, परंतु असाहाय असतात; अन् उलट सभ्य म्हणून राजरोस मिरवणारेच गुंडानाही लाजवतील अशी कृत्यं करीत असतात !" अन् आनंदभैय्याकडे तीव्र अर्थपूर्ण कटाक्ष टाकून रजनी थांबली.

तिच्या तेजस्वी चेहऱ्याकडे पपा अवाक् होऊन पहात राहिले. आपण ऐकलेले शब्द रजनीच्या तोंडूनच बाहेर पडले ना असा संभ्रम त्यांना झाला. रजनीची विलक्षण बुद्धिमत्ता ते जाणून होते–पण

त्यांना अपरिचित होती ती तिची धिटाई ! रजनी लहानपणापास्नं आईच्या वळणावर होती–भिडस्त, संकोची अन् मुख्य म्हणजे पपांना घाबरणारी. पण आज तिचं नवं रूप पपांना दिसलं होतं. प्रेम ही एक दिव्य शक्ती आहे. यासारखी वाक्यं त्यांनी ऐकली होती तरी प्रेमाचा कधी अनुभव न घेतलेल्या अन् हयातभर निर्जीव स्थापत्य-शास्त्राशी समरस झालेल्या त्यांच्यासारख्या रुक्ष, कठोर माणसाला ती अर्थशून्य वाटणं साहजिकच होतं–पण त्यातला अर्थ आज त्यांच्या प्रत्ययास येत होता–प्रेमाची शक्ती त्यांनाही जाणवत होती. बघता-बघता एका सुरवंटाचं रूपांतर स्वच्छंदपणे उडणाऱ्या फुलपांखरात झालं होतं ! रजनी बोलायची थांबल्यावर थोड्या वेळानं पपा आपल्या विचारातून-संभ्रमातून भानावर आले. खेदानं त्यांनी मान हलवली अन् निर्धारपूर्वक ते म्हणाले,

"रजनी, तुझ्याशी निरर्थक वाद घालायची माझी इच्छा नाही ! पुस्तकी ज्ञान मिळवलं असलंस तरी जीवनात तुला अजून पुष्कळ शिकायचंय्–तेव्हा पूर्ण विचारांती प्रत्येक पाऊल उचलून टाक ! आयुष्याची दिशा चुकायला एखादं अविचारी पाऊलही पुरेसं असतं ! तुला त्या सुधीरमध्ये काय गुण आढळले ते तुझे तुलाच ठाऊक, पण माझं मात्र ठाम मत आहे की तुला जे प्रेम वाटतंय् ते केवळ शारीरिक आकर्षण आहे ! ती धुंदी डोळ्यांवरून उतरली की तुला आपली चूक कळून येईलच–पण पण मला भीती वाटतेय् की तोपर्यंत फार फार उशीर झालेला असेल अन् पश्चात्ताप करण्या-खेरीज तुझ्या हाती "

"पपा–तुमचा स्वभाव मी लहानपणापास्नं ओळखतेय्! एखादी गोष्ट एकदा ठरवली म्हणजे काही झालं तरी तुम्ही ती बदलणार नाही म्हणजे नाही ! दुर्दैवानं माझ्या प्रेमाबद्दल तुम्ही भलतीच शंका-धास्ती मनात घेऊन बसलाहात–अन् जरी ती चूक आहे म्हणून तुम्हाला कळलं, पटलं तरी स्वमुखानं तुम्ही ते कधीही कबूल कर-णार नाही हेही मला ठाऊक आहे ! ठीक आहे, जशी तुमची मर्जी. पण मीही तुमचीच मुलगी आहे ! मलाही तुमच्याबरोबर वाद घालायचा नाही वा तुमचा लंबा-चौडा निरर्थक उपदेशही ऐकायचा नाही. सुधीरच्या अन् माझ्या प्रेमाच्या पूर्तीबाबत तुमचा निर्णय मला स्पष्ट शब्दात पाहिजे–एकाच शब्दात ! तुमचा पाठिंबा आहे की नाही ?"

पपा काही बोलण्यापूर्वीच खोलीच्या बंद दारावर टकटकीचा आवाज ऐकू आला–अन् आनंदभैय्या चटकन् उठून बाहेर गेला. दोन मिनिटातच त्यानं बाहेरून पपांना हाक मारल्यानं तेही अस्वस्थ होऊन बाहेर गेले अन् रजनी त्यांच्या परतण्याची वाट पहात एकटीच आपल्या जागेवर बसून राहिली. आनंदभैय्यानं पपांना तातडीनं बाहेर बोलावण्यासारखं काय असावं ? असा विचार तिच्या मनात येऊन गेलाही परंतु आपल्याच विचारांनी मन प्रक्षुब्ध होऊन गेल्यानं मुद्दाम उठून बाहेर जावंसं मात्र तिला वाटलं नाही. ती होती तशीच बसून राहिली. पण थोड्याच वेळात दरवाजाला बाहेरून कडी घातल्यासारखं तिला वाटलं अन् ती एकदम चमकली. 'आपल्या-पासून काही लपविण्यात येत नाही ना ?' या शंकेसरशी ती ताडकन् उठून दाराजवळ धावली. बाहेर दबत्या आवाजात, खालच्या पट्टीत असं काहीतरी बोलणं चाललं होतं. तिला सगळं काही कळलं नाही तरी सुधीर-हॉस्पिटल-अत्यवस्थ यांसारखे शब्द ऐकू येताच तिनं जिवाच्या आकांतानं दरवाजा उघडायला हात घातला–पण दार खरोखर बाहेरून बंद केलेलं होतं–

"पपा–दार उघडा ! पपा, भैय्या !" म्हणून ओरडत दारावर थापा मारण्याचा सपाटा रजनीनं लावताक्षणीच बाहेरचं बोलणं एकदम थांबलं अन् पपांचे "चल चालता हो–आम्हांला तुझं काही ऐकायचं नाही–रजनीशी भेट ? आता जातोस की गड्याकरवी हाकलवू ?" असे जरबेचे, हळू आवाजातले शब्द ऐकू आले.

"पपा–कोण आहे तो माणूस ? मला भेटू द्या त्याला–उघडा ना दरवाजा ? कां असे निष्ठुर होता ?" रजनीच्या डोळ्यात पाणी उभं राहिलं. काही तरी विपरीत घडलंय् या शंकेनं तिला केव्हाच घाम फुटला होता–हातपाय लटलटू लागले होते. परंतु निकरानं ती दार उघडू पहात होती–पपा अन् भैय्या दार उघडायला तयार नाहीत असं कळून येताच रजनीच्या दुःखाची जागा संतापानं घेतली. ती तीव्र शब्दात म्हणाली,

"पपा, जन्मभर दगडा-विटांशी काम करून तुमचंही मन तसंच कठोर बनलंय् का ? पोटच्या मुलीशी असा वैऱ्यासारखा दावा साधून तुम्ही काय मिळवणार आहात ? दार उघडा, नाहीतर तुम्हाला माझ्या आईची शपथ आहे ! –"

अन् दुसऱ्याच क्षणी खळकन् कडी निघाल्याचा आवाज झाला. दार उघडलं गेलं, परंतु उंबरठ्यावर दरवाजाच्या चौकटीवर हात आडवा ठेवून पपा उभे होते. जणु अंतरातल्या शब्दांना बाहेर पडता येऊ नये म्हणून त्यांनी ओठ घट्ट दाबून धरले होते.

"पपा, सांगा कोण होता तो माणूस ?–नाहीतर मला जाऊ द्या !"











रजनीच्या कळवळून विचारण्याचा पपांवर काहीही परिणाम झाला नाही. ते निश्चल राहिले. परंतु आनंदभैय्या मात्र तिरस्कारानं हसत कटु स्वरानं म्हणाला,

"कुठं जाणारेस आता जाऊन जाऊन ? सुधीरचे प्राण वाचवणं तुला शक्य नाही, रजनी !"

"भैय्या, काय झालंय त्याला ? निदान पूर्णपणे सांग तरी रे–" रजनी भीतीनं ओरडली–आनंदभैय्याचे शब्द ऐकून तिला ब्रह्मांड फिरल्यासारखं वाटलं होतं.

"त्याच्याच मवाली मित्रांनी–साथीदारांनी सुमारे तासापूर्वी घरात घुसून सुधीरला बेदम मारलं–त्याच्या मेंदूला जबर इजा झाली असल्यानं त्याला बाजूच्या लोकांनी हॉस्पिटलमधे नेलंय् ! तो म्हणे तुझं नाव वरळतोय् म्हणून एक शेजारी तुला कळवायला आला होता–डॉक्टरनी आशा सोडलेयेय तेव्हा निदान एकदा बघून"–आनंदभैय्याचं खुनशी; सूडाच्या आविर्भावात बोलावं तसं बोलणं पूर्ण व्हायच्या आतच त्याच्या छातीवर दोन्ही हातांनी त्वेषानं प्रहार करीत रजनी किंचाळली,

"नीच–पशू ! हे शब्द तुझ्यानं उच्चारवले तरी कसे ? भैय्या–तुला अगदी आनंदाच्या उकळ्या फुटताहेत जशा ! पण-पण तुला पाहिजेय् तसं कदापि होणार नाही !" अन् पपांकडे वळून ती निश्चयानं म्हणाली, "पपा–तुम्हाला शेवटचं निक्षून सांगतेय्–मला अडवू नका ! मला जाऊ द्या–नाहीतर. . . ."

"नाहीतर काय ?"

"नाही तर–नाही तर लग्नापूर्वीच तुमची लेक विधवा होईल!"

त्या भयानक शब्दांच्या प्रहारानं पपांचा हात लुळ्यासारखा दारावरनं गळून पडला ! आपल्याच दुबळेपणावर दातओठ खात ते म्हणाले,

"तुझं सौभाग्य का दुर्भाग्य काय असेल ते मला हिरावायचं नाही–पण एवढंच लक्षात ठेव एकदा का या घराचा उंबरठा ओलांडलास तर तुला पुनः आत येता येणार नाही ! या घराचं दार तुझ्यासाठी–" अन् त्यांच्या एकदम लक्षात आलं की आपले हे शब्द ऐकायला रजनी जागेवरच नाहीय–

रजनीनं आपल्या बंगल्याचा उंबरठा केव्हाच ओलांडला होता अन् एकदाही मागं न वळून पाहाता ती झपाट्यासारखी रस्त्याला लागली होती ! तिचं शरीर तिच्या पायांच्या गतीनं चालत होतं तरी मन मात्र केव्हाच वायुवेगानं पुढं गेलं होतं–सुधीरपाशी जाऊनही पोहोचलं होतं ! मनोमन ती स्वतःलाच दिलासा देत होती की सुधीरची स्थिती अजूनही डॉक्टरांच्या आवाक्याबाहेर गेली नसेल–अजूनही तो निश्चित वाचेल ! वाचेल ! !–वाचेल ! ! !

रस्त्यावर एव्हाना हळूहळू अंधार दाटू लागला होता–अन् रजनीच्या मनात तर अक्षरशः काळोख पसरल्यासारखं झालं होतं ! स्वतः ती स्वतःला देत असलेला दिलासाही पुरेसा नव्हता ! काय करावं–वो काय करतो आहोत–आपण कुठं जात आहोत याचंही तिला भान नव्हतं–पायांना जेवढी गती देता येईल तेवढ्या वेगानं ती चालत होती–तिच्या डोळ्यापुढं अंधारातून आशेचा एकच किरण लुकलुकत होता–डॉ. नरवणे !

एखाद्या आंधळ्याला छोट्या मुलानं हात धरून रस्ता क्रॉस करून द्यावा तसं रजनीच्या बेभान शरीराला तिच्या पायांनी बरोबर जिथं जायचं होतं तिथं नेऊन सोडलं ! 'डॉ. नरवणे' ही दरवाजावरची पाटी वाचून रजनीनं सुटकेचा निश्वास टाकला अन् निस्त्राण हातानं बेलवर पंजा दाबला.

क्षणभरानं दार उघडलं गेलं–खुद्द रजनीचे डॉक्टरकाकाच दरवाजात उभे होते–अंगावर बाहेर जायचा पोशाख चढवून ! अवेळी दारात आलेल्या रजनीचा अवतार पाहून त्यांच्या चेहऱ्यावर प्रकटलेलं आश्चर्य शब्दरूपानं ते बोलणार एवढ्यात त्यांना पाहून मनावरचा ताण एकदम कमी झालेली रजनी 'डॉक्टरकाका !' असा आर्त उद्गार काढून त्यांच्या पायावर कोलमडली !

"बेटी रजनी, हा प्रकार तरी काय आहे!" म्हणून पुटपुटत त्यांनी रजनीला सावरलं अन् कोचावर नेऊन बसवलं. त्यांनी हाक मारताच त्यांच्या सुनेनं पाणी आणलं. ते डोक्यावर शिंपडताच रजनी सावध झाली. तिनं डोळे उघडून पाहिलं अन्. डॉक्टरकाकांच्या सुनेचं पांढरं फटफटीत कपाळ पाहताच तिच्या काळजात कळ उठली !

सुमारे २-३ वर्षांपूर्वी डॉक्टरकाकांचा एकुलता एक मुलगा विश्वास लग्नानंतर केवळ वर्षा-सव्वा वर्षानं अपघाती अकस्मात् मृत्यु पावला होता–अन् त्या आघातानं डॉक्टरकाका साफ खचले होते ! रजनीच्या पपांकडे त्यांचं येणं–जाणंही थांबलं होतं. ते एकदम विरक्त झाल्यासारखे झाले होते ! विश्वासच्या पत्नीकडे नजर जाताच रजनीला या साऱ्या गोष्टी आठवल्या अन् तिच्या मनात आलं,

"प्रत्यक्ष पोटच्या पोरालाही वाचवता आलं नाही डॉक्टरकाकांना–अन् अन् आपण आशा बांधून आलो आहोत खऱ्या !










त्यात पुन: डॉक्टरकाकांची भरमसाठ फी—आपल्याजवळ तर नेसत्या वस्त्राखेरीज काऽही नाही ! डॉक्टरकाकांना पैशांचा लोभ—आपली हकीकत कळल्यावर डॉक्टरकाका दाराशी तरी उभे करतील का आपल्याला ?—" अन् मनातले सारे दुष्ट विचार झटकून टाकीत तिनं डॉक्टरकाकांकडे वळून घायकुतीनं विचारलं,

"डॉक्टरकाका, तुम्हांला कुठं जायचं होतं ?"

"एका अर्जंट—अवघड अशा मेंदूच्या ऑपरेशनसाठी जायचं होतं—पण आता मात्र तुझ्याकडून तुझ्या ह्या अवचित येण्याबद्दल सारं काही कळल्याखेरीज मी इथून हलणार नाही !"

रजनीला धीर आला. तिनं आवंढा गिळला अन् मोजक्या शब्दात सुधीरवरच्या आपल्या प्रेमाची अन् त्यापायी घरदार सोडायला लागल्याची हकीकत सांगून टाकली—अन् शेवटी.

"—डॉक्टरकाका, सुधीर आता हॉस्पिटलात कदाचित् शेवटच्या घटका मोजीत असेल ! तो वाचणं शक्य असेल तर त्याला केवळ तुम्हीच वाचवू शकाल. या क्षणाला मी दरीद्री आहे पण तुमच्या पाया——"

"पुरे ! पुरे !! रजनी, बेटी—" म्हणून तिची हकीकत ऐकताना तल्लीन झालेल्या डॉक्टरकाकांनी एकदम भानावर येऊन तिच्या तोंडावर हात ठेवला अन् तिच्या दंडाला धरून उठवीत ते म्हणाले,

"रजनी, मगाशी मी बाहेर पडत होतो मेंदूच्या ऑपरेशनसाठी ते तुझ्या सुधीरचंच ऑपरेशन होतं ! तू येण्यापूर्वी दहा-पंधरा मिनिटंच हॉस्पिटलमधनं मला फोन आला होता. पेशंटचं नांव कळलं नव्हतं—कळवून घ्यायची जरूरही वाटली नाही. परंतु तू हॉस्पिटलचं नाव सांगताच अन् मेंदूला मार बसण्याचं कारण सांगताच लक्षात आलं सारं ! हा मी तयारच आहे—चल उठ ! डोळे पूस —!"

रजनीचा स्वत:च्या कानांवर विश्वास बसत नव्हता ! ती यांत्रिकपणे उठून उभी राहिली अन् आवेगानं "खरंच ?" म्हणून डॉक्टरकाकांच्या खांद्यावर तिनं मान टाकली !

थोड्याच वेळानं आपल्या संभ्रमातून भानावर आल्यावर रजनीला जाणवलं की भरवेगानं जाणाऱ्या मोटारीत आपण डॉक्टरकाकांच्या बाजूला बसलो आहो अन् आपल्याला मायेनं थोपटीत ते प्रेमळपणे म्हणताहेत,

"—विश्वासच्या अपघाती—अचानक अपमृत्यूनं माझे डोळे उघडल्यासारखे झाले ! प्रत्यक्ष धन्वंतरी अश्विनीकुमार म्हणून ओळखला जाणार डॉक्टर मी—पण पण माझ्या पोटच्या गोळ्याला वाचवायची यत्किंचितही संधी न देता मृत्यूनं त्याला माझ्यापासून हिरावून नेलं ! परमेश्वरी करणीपुढं मी दुबळा ठरलो ! परंतु शोकाचा भर ओसरल्यावर विचारान्ती मला नवी जाणीव होऊ लागली—विश्वासला असं तडकाफडकी नेऊन परमेश्वराला हे तर सुचवायचं नव्हतं की मृत्यु गरीब-श्रीमंत असा भेद करीत नाही ! कुणालाही तो अघटितपणे—कुठल्याही क्षणी येऊ शकतो !—अन् या जाणीवेनं माझं अंतर्मन पार ढवळून निघालं—पैशांचा लोभ पार धुवून गेला ! जीवनातले अनेक प्रसंग डोळ्यापुढं उभे राहिले. अनेकांनी नव्हे अगणित मुखांनी कुणा ना कुणाच्या प्राणांची भीक मागितली होती—पदर पसरले होते—हातापाया पडून अश्रू गाळले होते अन् आपण दरवेळी उर्मटपणे केवळ पैशांवर नजर ठेवून त्यातल्या कित्येकांना विन्मुख धाडलं होतं—अन् साऱ्यांचा बदला जणु परमेश्वरानं विश्वासचे प्राणहरण करून घेतला ! विश्वासच्या प्राणांची त्याच्याकडेही भीक मागायचा अवसर न देता ! एवढा पट्टीचा पोहणारा विश्वास, जुहूच्या बीचवर पोहायला गेला तो परत आलाच नाही ! पण त्याच्या मृत्यूनं डोळे उघडले माझे. सारी आसक्ती ओसरली अन् उर्वरीत जीवन पूर्वजीवनातील अन्याय दूर करण्यात वेचायचं ठरवलं" डॉ. नरवणे किंचित् हसले अन् पुढं म्हणाले,

"पूर्वी पेशंट मला विनविण्यासाठी हाता-पाया पडायचे. माझी कीर्ती माहीत असल्यानं हॉस्पिटलांच्या वतीनं कधी फोन येत नसे. परंतु हल्ली सर्वांना ठाऊक झालंय् की माझा दरवाजा कुणासाठीही २४ तास उघडा असतो, त्यामुळं फोन येतात ते हॉस्पिटलांमधूनच. पेशंटचं नाव-गावही कळत नाही; जरूरही वाटत नाही म्हणा—अन् मी प्रयत्नांची पराकाष्ठा करतो, यश खेचून आणतो ! रजनी, खरं सांगायचं ना, तर या अशा निरपेक्ष प्रयत्नातून फाऽर मोठं समाधान मिळतं—पैशातही मोजता येणार नाही असं ! अन् रजनी, मला हेही समजून चुकलंय् की या जगात उपकाराचं ओझं कुणीही बागवत नाही ! पैशानं भरपाई केली नाही, तरी लोक भरल्या मनानं दुवा देतात—तुमचं भलं चिंतितात ! मगाशी तुला मी अडविलं तेव्हा तू मला सांगणार होतीस ते हेच की 'डॉक्टरकाका मला तुमची फी देता येणार नाही वगैरे वगैरे ! पण रजनी—चुकतेस तू ! मला फार मोठी फी मिळणार आहे—जन्मभर तू मला विसरू शकणार नाहीस ! बस्, मला तेवढंच पुरेसं आहे ! अग अशी डोळे विस्फारून बघतेस काय, तुला खरं वाटत नाही ? विश्वास बसत नाही माझ्या बोलण्यावर ? घाबरू नकोस—आज मी एका वेगळ्याच धुंदीत आहे. सुधीरच्या जीवनाशी एवढी समरस झाल्येस् तू—तेव्हा तुला ठाऊक असेलच की त्याच्या आईच्या बाबतीत माझ्याकडून अक्षम्य अपराध घडलाय्—कदाचित् सुधीरच्या बदललेल्या जीवनाचं पापही देवाच्या दरबारी माझ्या डोक्यावरही येऊ शकेल ! आज थोडसं तरी परिमार्जन निश्चित करीन मी ! रजनी बेटी, माझ्या सूनबाईचं सौभाग्य राखायची संधीच मला परमेश्वरानं दिली नाही. परंतु माझ्या मुलीचं—तुझं सौभाग्य परमेश्वरानं माझ्या हाती दिलंय् अन् —माझ्या हातातून तुझ्या सुधीरला हिरावून नेणं आतां प्रत्यक्ष कळी-काळालाही शक्य नाही—नाही—त्रिवार नाही !!!—"

घड्याळाच्या पुढं सरकणाऱ्या काट्यांबरोबर बाहेरचा रात्रीचा अंधारही अधिकाधिक गडद होत होता—परंतु रजनीच्या डोळ्यांपुढं मात्र नवी पहाट उमलत होती !!!

●●●








# लोहगड ते लंडन

—श्री. ह. सी. उर्सेकर



...इंगलातून प्रवास करताना दुतर्फा छोटे-मोठे तळाव बिलोरी आरशांप्रमाणे चमकत होते. मोटारीतून उतरून त्यातलं ओंजळी पाणी प्यावं असं कितीकदा तरी वाटलं... वाटलं काय 'पाणी'दार देश आहे हा...

## २ फिनलँड

निळाशार बाल्टिक समुद्र ओलांडून 'फिनएअर'च्या आटोपशीर विमानाने स्टॉकहोमहून सुमारे एका तासात हेलसिंकी गाठले. सायंकाळचे सहा वाजले होते तरी चार वाजल्यासारखे वाटले. कारण उन्हाळा असल्याने दिवस १८ तासांचा आहे. हेलसिंकी विमानतळाची वास्तु 'फिनएअर'च्या विमानाप्रमाणे लहानसरच आहे.

हेलसिंकी ही फिनलँडची राजनगरी. फिनलँड हा एक स्कॅन्डेनेव्हीयन देश आहे. नॉर्वे, स्वीडन व आईसलँड हे अन्य स्कॅन्डेनेव्हीयन देश. लोकमान्य टिळकांचा 'Arctic Home in the Vedas' हा मौलिक संशोधन ग्रंथ वाचल्यापासून उत्तरेकडील आर्यांचे मूळ वसतीस्थान पहावे अशी तीव्र इच्छा मनीमानसी बाळगून होतो. लोकमान्यांचा सिद्धांत असा की आर्य लोक मूलतः उत्तर ध्रुवाजवळील आर्क्टिक प्रदेशात रहात असावेत. या सिद्धान्ताला प्रमाण म्हणून आर्यांचा आदि ग्रंथ जो ऋग्वेद त्याचा त्यांनी आधार घेतला. ऋग्वेदात दीर्घ रात्रींचे उल्लेख आहेत. उषःकाल तर चाळीस दिवसांचा ! अनेक दिवसांच्या काळोखानंतर 'उषःकालचे तांबडे फुटले. आभाळांतरी' की वैदिक कवींची काव्यप्रतिभा मोहरून येई. एक ऋषी म्हणतो ही उषा म्हणजे केस मोकळे सोडून प्रियकरामागे जाणाऱ्या कुमारीप्रमाणे आहे. ऋग्वेदात सूर्याला तीन नावे आहेत. उगवताना तो मित्र असतो तर उगवण्यापूर्वी त्याला सविता हे नाव आहे. नंतर तो सूर्य होतो. या निरनिराळ्या नावांचे कारणही अनेक महिने सतत दिसणारे सूर्यबिंब हे असावे. इंद्रवृत्र म्हणजे सूर्य व काळोख यांचे प्रदीर्घ रूपकच. वृत्रासूर म्हणजे प्रदीर्घ काळोख ! हा असूर आर्क्टिक वर्तुळात ७० ते ९० अक्षांशापर्यंतच्या ध्रुवबंधात धुमाकूळ घालतो. इंद्रदेव त्याला वज्राने नष्ट करतो व सूर्यप्रकाश पृथ्वीवर आणतो. यासाठी ऋषी यज्ञयाग करीत. लांबलांब रात्री रेंगाळणारा उषःकाल हा निसर्गक्रम, असा प्रदीर्घ वसंतकाल व हेमंतकाल फक्त उत्तर ध्रुवबंधातच शक्य आहे म्हणून हीच आर्यलोकांची मूलभूमी असावी. कदाचित् आर्यांचे मूळ वसतीस्थान फिनलँडमध्ये असावे. म्हणूनच या भूमीविषयी मला फार कुतूहल होते. या ऐतिहासिक कारणाप्रमाणेच फिनलँडविषयी मला एक आधुनिक आकर्षणही होते. ते म्हणजे या देशातील प्रगत समाजकल्याण व्यवस्था. यामुळे हेलसिंकी येथे ऑगस्ट १९६८ मध्ये चौदावी आंतरराष्ट्रीय समाजकल्याण परिषद भरणार होती तिला हजर राहण्यासाठी, भारताचा प्रतिनिधी म्हणून या परिषदेला मी आलो होतो. . आर्यावर्तातून आर्क्टिक प्रदेशात !

आपण इंग्रजीत फिनलँड म्हणतो पण फिनीश लोक आपल्या मायदेशाला 'स्योमी' ('Suomi') म्हणतात. स्योमी हे फिनी भाषेचे नांव. स्योमी भाषेचा देश म्हणून त्याला फिनी लोक स्योमी म्हणतात. या देशाला बाल्टिकची कन्या असे काव्यमय उपनाव आहे. मी या देशाला बाल्टिका म्हणेन !

साठ ते चौऱ्याहत्तर अक्षांशांच्या कुशीत फिनलँड सामावलेला

आहे. युरोपचा सर्वात उत्तरेकडील हा देश. उत्तर ध्रुवबंध सत्तर अक्षांशापलीकडे उत्तरेस पसरला आहे. त्यालाच आर्क्टिक वर्तुळ म्हणतात. २४० मैलपर्यंत उत्तर ध्रुवबंधात फिनलँडचा माथा आहे. त्या भूप्रदेशाला लॅपलँड म्हणतात. फिनलँडप्रमाणेच नॉर्वे व स्वीडन देशाच्या उत्तर भागातही लॅपलँड आहेत. या अतिशीत प्रदेशात लॅप नावाचे वनचर राहतात. ते शिकारी, मेंढपाळ आहेत. रेनडीयर या प्राण्यांच्या जिभांचे एक विशिष्ट पक्वान्न शिजवून ते आपले जिव्हालौल्य भागवतात. लॅप वस्ती दहा हजार वर्षांपूर्वीपासून तेथे आहे असे मानतात. लॅप लोक फिरस्ते आहेत. हेलसिंकीचे एका अद्ययावत् दुकानात एक लॅप जोडपे मला दिसले. रेनडीयरच्या कातड्याचा पोषाख, कमरेला सुरी, डोक्याला पांढऱ्या शुभ्र मुलायम पिसाऱ्याचे शिरस्त्राण असा बहुरंगी चित्रासारखा त्यांचा पोषाख होता. ते रुबाबदार चपलचरण लॅप युगुल पाहून मनात एक कल्पना चमकून गेली. कदाचित् ह्या तरतरीत फिरस्त्या, शिकार करून रहाणाऱ्या मेषपाळांचे पूर्वज हेच आमच्या आर्यांचे पूर्वज असतील !

फिनलँड हा देश साधारण उंच मानेच्या सुरईच्या आकाराचा दिसतो. ७२४ मैल दक्षिणोत्तर लांबी तर दक्षिणेकडे जास्तीत जास्ती फक्त ३३७ मैल रुंदी आहे. उत्तर ध्रुवबंधात हा देश फक्त साठ ते सत्तर मैलच रुंद आहे. एक लाख तीस हजार चौरस मैल क्षेत्रफळ असलेला फिनलँड, ग्रेट ब्रिटन किंवा पश्चिम जर्मनीहून मोठा आहे. लोकसंख्या मात्र फक्त ४७ लाख म्हणजे मुंबई शहराहूनही कमी. त्यामुळे प्रचंड वाडा असावा पण वस्तीला माणसे कमी असली की जसे वाटते तशी फिनलँडची अवस्था वाटली.

फिनलँड काश्मीरसारखा निसर्ग सौंदर्याने नटलेला देश आहे. वनश्री व जलश्री येथे विपुल. सुमारे ३/४ भूप्रदेशात दाट जंगले. त्यात सुंदर जलाशये जागोजाग खेळत असतात. सुमारे ५५००० सरोवरे फिनलँडमध्ये आहेत. देशाचा एक दशांश भूभाग जलमय ! हेलसिंकीहून तीस मैलावरील एका छोट्या नगरात आम्ही वसने गेलो. वाटेत जंगलातून प्रवास करावा लागला. छोटे मोठे तलाव दोन्ही बाजूला विलोरी आरशांप्रमाणे चमकत होते. काय पाणीदार देश आहे ! मध्येच उतरून तळ्यातील सोनसळी पाणी प्यावे असे वाटले पण आमचा सारा आंतरराष्ट्रीय प्रवासी मेळावा. आंतरराष्ट्रीय रीतीभातींचे उल्लंघन आपल्या हातून न होवो ही भीती मनात खोल होती ना ! या नगरात सहकारी पद्धतीवर घरे बांधली आहेत. तेथे खेळांची मैदाने प्रामुख्याने दिसत होती. व्हॉलीबॉल व फुटबॉलची मॅच चालू होती. खेड्यातही वीज खेळते आहे. भूदेवी, जलदेवी आणि वनदेवी यांचा इतका मनोज्ञ आणि विस्तृत त्रिवेणी संगम इतरत्र क्वचित् आढळेल. पण इतकी घनदाट वनश्री असूनही वर्षाला पाऊस मात्र १६ ते २१ इंच पडतो. आणि ती रिमझिम वर्षभर चालते. तेव्हा विपुल वनराजी आणि वर्षाराणी यांच्यातील तथाकथित कार्यकारण भावाच्या माझ्या समजुतीला धक्का बसला.

फिनलंडमध्ये ग्रीष्म ऋतू फक्त मंगळवार ते गुरुवारपर्यंतच टिकतो असे कुचेष्टेने म्हणतात. मी गेलो ऑगस्टमध्ये. तेव्हा ग्रीष्म ऋतूच होता. मुंबईत डिसेंबरमध्ये असते इतकी थंडी होती. मधून-मधून पाऊस पडून भूमी चिंब भिजे व थंडी वाटे. पण एकंदर हवा सुसह्य व उत्साहक होती. हेलसिंकीत दिवस अठरा तासांचा होता. रात्री ९ वाजले तरी संधिप्रकाशामुळे वाटे संध्याकाळचे ६ वाजलेत. दहाला अगदी नाईलाजाने काळोख पडे. एखाद्या खोडकर उत्साही मुलाला त्याची आई वळेच मारून मुटकून उशीरा झोपवते ना तसा प्रकार वाटला. एक दिवस मध्येच जागा झालो तर उजाडल्यासारखे दिसले. घड्याळ म्हणत होते वाजले होते फक्त चार ! उठला वाटते कार्टा. . . प्रकाश !

हेलसिंकी ६० अक्षांशावर आहे. त्यामुळे तिथे फक्त १८ तासांचा दिवस, पण उत्तर ध्रुवबंधाकडे तर उन्हाळ्यात सूर्य मावळतच नाही आणि म्हणूनच फिनलँडला मध्यरात्रीच्या सूर्याचा देश म्हणतात. हा रात्रीचा दिवस पहाण्याचे भाग्य मला लाभले नाही. साधारण १ जून ते १० ऑगस्ट या काळात दिनकर निशानाथ झाल्याचे दृश्य दिसते. कारण वसंत ऋतूत ७० दिवसपर्यंत सूर्य मावळतच नाही. . .सारखा ओव्हरटाईम करीत असतो. जणु निसर्गसुंदरी सूर्याला म्हणते मावळू नको व चंद्राला म्हणते उगवू नको ! पण वसंतात सूर्य आणि चंद्र वसुंधरेवर प्रीतीचा वर्षाव करतात ! एक कली दो माली !

मध्यरात्री सूर्यदर्शन ही कल्पना म्हणजे भारतात 'वदतो व्याघाताचे' उदाहरण वाटते. सशाला शिंगे कशी असतील ! पण अमर्याद जग प्रत्यक्ष पाहिले की आपल्या संकुचित संकेतांना तडा जाऊन माणसाचे मन विशाल व सुसंस्कृत बनते ! उदारसंग्राहकता हे सुसंस्कृतपणाचे लक्षण होय ! वसंतकालात उत्तर ध्रुवबंध प्रदेशात चोवीस तास अहोरात्र सूर्य आपल्या दृष्टीसमोर भ्रमण करताना दिसतो. पण यासाठी हेलसिंकीहून उत्तरेला सुमारे पाचशे मैल असलेल्या 'रुवानेमी' शहरास जावे लागते. त्यापलीकडे गेल्यावर

# "नाश्त्याबरोबर मी नेहमी तांबं खातो !"



शिवाय लोह, कॅल्शियम अन् आयोडिन खातो ते वेगळंच. खरं तर हे सदगृहस्थ ८ महत्त्वाची खनिज द्रव्ये अन् ११ अत्यावश्यक जीवनसत्त्वे घेत असतात. निरोगी जीवनाला अपरिहार्य असलेली ही सारी द्रव्ये व्हिमग्रॅनच्या अवघ्या एका टॅबलेटमध्ये सामावलेली असतात. नुसतेच आरोग्य नाही तर उत्साह अन् प्रखर रोगप्रतिबंधक शक्ति यांसाठी आवश्यक असणारी सारी जीवनसत्त्वे व खनिज द्रव्ये व्हिमग्रॅनमध्ये आहेत. उदाहरणच द्यावयाचे झाले तर तांबं घ्या. ताज्या रक्ताची निर्मिती अन् कामासाठी लागणारा उत्साह आपल्याला या खनिजामुळे मिळतो. व्हिमग्रॅनमधील इतर जीवनसत्त्वे व खनिज द्रव्ये नियमित घेतल्याने या सदगृहस्थांची त्वचा अन् दृष्टी अतिशय निरोगी राहिली असून त्यांचे दात अन् हाडेही पूर्वी कधी नव्हती एवढी कणखर आहेत.

# व्हिमग्रॅन®

अनेकविध जीवनसत्वे
व खनिजे असलेल्या टॅबलेटस






® हा रजिस्टर्ड ट्रेडमार्क ई.आर. स्क्विब अँड सन्स यांचा असून तो वापरण्याची अनुमती करमचंद प्रेमचंद प्रा. लि. यानी मिळविली आहे.

## व्हिमग्रॅनची अवधी एक टॅबलेट दिवसासाठी लागणारा सारा उत्साह मिळवून देते.

SQUIBB®
SARABHAI CHEMICALS

Shilpi SC 7/69 MAR

अनुक्रमणिका








उत्तर ध्रुववंध उल्लंघून तुम्ही गेलात असा दाखला तुम्हाला देण्यात येतो. विषुववृत्त ओलांडल्यावर एक विशिष्ट समारंभ करण्याचा नाविक संकेत प्रसिद्धच आहे. तसाच हा काहीसा प्रकार.

जपानमध्ये चंद्रोदय पहाण्याकरता रसिकांच्या झुंडी टेकडीवर निःशब्दपणे जमतात. तसेच रवानेमी नजीकच्या मध्यरात्रीच्या सूर्य-दर्शनाकरता आंतरराष्ट्रीय जत्रा वसंत ऋतूत जमते. रात्री बारा वाजता सुमारे हातभर क्षितिजावर सूर्य दिसतो. मग तो क्षितिजाच्या रेषेवरून एखाद्या लहान मुलाच्या खेळचाकासारखा पुढे पुढे सरकतो व दोनच्या सुमारास पुन्हा क्षितिजावर चढू लागतो. पहाटे तीनच्या सुमारास सूर्यबिंब दोन हात वर दिसते. सूर्यदेवाच्या या निशःचरत्वाचा निरनिराळ्या नऊ स्थितींचा काढलेला फोटो मी मिळविला आहे. सूर्यभ्रमणाचा हा रेखातक्ता बशीच्या आकाराचा पॅराबोला आहे. वसंतातील सत्तर दिवसांचा हा प्रदीर्घ दिवस फक्त उत्तर फिनलॅंडमध्येच असतो. हेमंतात पन्नास दिवसाची तमोमय रात्रही उत्तर ध्रुववंधापलिकडेच रेंगाळते. हेलसिंकीत मात्र सर्वात लांब रात्र व दिवस १९ ते २१ तासांचा असतो.

रविराजाच्या या 'सर्वोदय' दर्शनानेच कदाचित् ब्रह्माच्या अनादि अनंतत्त्वाची कल्पना प्राचीन ऋषींच्या प्रतिभेला स्फुरली असावी. वेदात 'ब्रह्म सूर्यसमं ज्योतिः' म्हणजे ब्रह्म हे सूर्यप्रमाणे एक तेज आहे असे ब्रह्मवर्णन आहे. या वसंतीच्या सूर्याला जसा उदय ना अस्त तसेच अनादि अनंत ब्रह्माचे स्वरूप असावे तशी ती कल्पना असावी.

फिनी लोक चांगलेच उंच असतात. ते आरक्त शुभ्र वर्णाचे आहेत. तशाच स्त्रियाही ! डोळे काळसर आणि केस सोनेरी. काही पुरुषही लांब केस वाढवतात. तरुणींचे केस पऱ्यांप्रमाणे सोनेरी सुबक असतात. फिनलॅंडवर सुमारे ८०० वर्षे त्याचा शेजारी देश स्वीडनचे साम्राज्य असल्याने येथील लोक स्योमी (फिनिश )व स्वीडीश भाषा बोलतात. क्वचित् काही लोकांना इंग्रजी येते. हेलसिंकीला दुकानात मी इंग्रजी बोलण्याचा प्रयत्न केला. पण पुष्कळ वेळा प्रतिसाद मिळाला नाही. म्हणून मग मराठीतच साभिनय प्रश्न विचारू लागलो. कारण ज्यांना इंग्रजी येत नाही त्यांच्या कानाला इंग्रजी व मराठी यात फरक नाही. माझ्या या हेलसिंकीतील मायमाऊलीच्या प्रयोगाचा एक आंतरराष्ट्रीय विनोदच झाला होता असे भारतात आल्यावर माझ्या कानावर आले.

फिनलॅंडमध्ये स्योमी बोलणारे ९२ टक्के लोक आहेत व स्वीडीश जाणणारे ८ टक्के फक्त ! पण फिनलॅंड हा द्विभाषिक देश आहे. फिनिश व स्वीडीश भाषेत लिहिलेल्या जोडपाट्या रस्त्यावर सर्वत्र आढळतात. फिनी विद्यार्थ्याला या दोन व शिवाय एक परकी भाषा शिकावी लागते. फिनी भाषचे एक वैशिष्ट्य म्हणजे संस्कृत-प्रमाणे त्यात विसर्ग आहे.

फिनी लोकांना व्यायाम व खेळ यांची विशेष आवड दिसली. प्रत्येक खेड्यात वा नगरात क्रीडांगण हा एक सामाजिक जीवनाचा अवश्य भाग आहे. फूटबॉल, हॉकी, व्हॉलीबॉल, वर्फावरून स्कीइंग करणे वगैरे मर्दानी खेळ फार लोकप्रिय आहेत. पावानुर्मी ह्याने दहा हजार मिटर धावण्याच्या ऑलिंपिक सामन्यात जागतिक विक्रम करून १९२० पासून २४ वेळा तो अजिंक्य राहिला. त्याचा ऑलिंपिक स्टेडियमसमोर धावण्याच्या जोषातील स्फूर्तिदायक पुतळा आहे. आधुनिक काळात आपल्याकडे पोर्ट्रेट शिल्प दिसते ! फोटोवरून बनलेले क्रियाशून्य सुस्तीदायक पुतळे ! उलट फिनलॅंडमधील क्रियाशील शिल्प फारच स्फूर्तिदायक आहे. शिल्प हे सुस्तीदायक नसावे, स्फूर्तिदायक असावे. आता हेलसिंकीत नुर्मीचे क्रीडा-साहित्याचे दुकान जोरात चालू आहे. मनुष्य हा स्वभावतःच वीरपूजक आहे हेच खरे.

१९५२ साली हेलसिंकी येथे जागतिक ऑलिंपिक सामने भरले होते. त्यावेळी बांधलेल्या लंबवर्तुळाकार प्रचंड स्टेडियमवर आजही पाईन वृक्ष चवऱ्या ढाळीत आहेत. तेथील विजयस्तंभावर हॉकीचे सुवर्णपदक मिळवल्यावद्दल भारताचे नाव वाचून मला अभिमान वाटला. पण लगेच मन खिन्न झाले, महाराष्ट्रातील ३/४ जिल्ह्यांची लोकसंख्या असणाऱ्या चिमुकल्या देशाने ऑलिंपिक सामने भरवण्याचा यजमानपणाचा मान मिळवावा पण भारताला अजूनही तो मान कां दुरावतो आहे !

मैदानी खेळांप्रमाणे नाटकांचे खेळ पहाण्याचीही फिनी लोकांना फार आवड आहे. येथे लोकसंख्येच्या मानाने पुष्कळच नाटचगृहे आहेत. हेलसिंकीत बारा थिएटर्स आहेत. कीव्ही या फिनलॅंडच्या राष्ट्रीय नाटककाराचे 'कॉबलर्स ऑफ द हीथ' हे आपल्या सौभद्रासारखे नेहमी हाऊसफुल व प्रफुल्ल असे नाटक आहे. मॉस्को आर्ट थिएटरच्या नटसंघावरोबर १९०६ साली स्टॅनीस्लाव्हास्की हा जगश्रेष्ठ रशियन नट फिनलॅंडला गेला होता. त्या मुक्कामातच नटाच्या अभिनयावावतच्या भावस्मृतीच्या त्याच्या (Emotional Memory) सिद्धांताने आकार घेतला आहेच. ही स्योमी भूमी स्फूर्तिदायक. सिवेलीयस या संगीत सूर्याने फिनलॅंडला स्वतःचे असे संगीत दिले आणि त्याच्या कर्णमधुर व भावपूर्ण संगीतामुळे फिनी संगीताला सिवेलीयस म्युझिक असे नांव पडले.

लोकसंख्येवर राष्ट्रीय पराक्रम अवलंबून नसतो तर त्यातील लोकांच्या व्यासंगी गुणवत्तेवर राष्ट्राची प्रगती अवलंबून असते. या चिमुकल्या देशावर १८१२ पर्यंत सुमारे आठशे वर्षे स्वीडनचे साम्राज्य होते. नंतर सुमारे शंभर वर्षे रशियाचे राज्य ! १९१७-नंतर फिनलॅंड खरा स्वतंत्र झाला पण आतापर्यंत त्याने तीन नोबेल पारितोषिके पटकावलीत. १९३९ मध्ये सिलाम्पाच्या 'मीक हेरीटेन' या कादंबरीने नोबेल पुरस्कार पटकावला. मोर्ने व लीनो हे फिनलॅंडचे कविश्रेष्ठ !

१९१७ पासून फिनलॅंड हे सार्वभौम प्रजासत्ताक लोकशाही राज्य आहे. पूर्वेकडे त्याचा पूर्वशास्ता रशिया तर पश्चिमेकडे भूत-

पूर्व सम्राट स्वीडन ! पण या वलाढ्य राष्ट्रांच्या कात्रीत निर्भयपणे हे राष्ट्र प्रगतीपथावर वाटचाल करीत आहे. त्याचे सध्याचे राष्ट्राध्यक्ष केक्कोनेन हे आहेत. त्यांची कारकीर्द सहा वर्षांची असते. मंत्रीमंडळात फक्त ११ मंत्री. ते लोकनियुक्त पार्लमेंटचे सभासद असावे लागतात. पार्लमेंटची निवड चार वर्षांनी होते. सध्याच्या पार्लमेंटमध्ये २०० पैकी ५५ सोशल डेमॉक्रॅटस् आहेत. मध्य पक्ष, कॅम्युनिस्ट, मवाळ पक्ष, स्वीडीश पक्ष व किसान पक्ष वगैरे अनेक पक्षांचे प्रतिनिधी पार्लमेंटात आहेत.

फिनलॅंडमधील न्यायालये स्वतंत्र आहेत. ५ ते १२ सभासदांच्या ज्यूरीच्या साहाय्याने खटले चालतात. ज्युरीचा एकमुखी निर्णय कोर्टावर बंधनकारक असतो. भारतात आता ज्यूरी पद्धत नष्ट करण्यात आली आहे. येथील न्यायपद्धतीचे दुसरे वैशिष्टय म्हणजे खटल्यांच्या वर्गवारीप्रमाणे विशिष्ट कोर्टे असतात. उदाहरणार्थ विमाविषयक, जमीनविषयक, तुरुंगविषयक अशी स्वतंत्र कोर्टे आहेत. सिव्हील सर्व्हिस कोर्ट सरकारी नोकरांच्या विरुद्ध तक्रारींची चौकशी करते. सर्वात श्रेष्ठ अपील कोर्ट म्हणजे सुप्रीम कोर्ट हे हेलसिंकीत आहे.

हेलसिंकी ही निसर्गरम्य नगरी फिनलॅंडच्या दक्षिण टोकास फिनलॅंडच्या आखातावर वसलेली आहे. तिला धवलपुरी (White City) असे अभिधान आहे. नीलसागर व नीलाकाश यांच्यामध्ये या नगरीची शुभ्रता फारच खुलते. अगदी दोन निळ्या जादुगार नयनांमध्ये गोरीगोमटी नासिकेची पांढऱ्या चाफ्याची कळी फुलावी तशी. पाच लाख अठ्ठावीस हजार वस्ती आहे येथे. शहरात दहा मजली अद्यावत् भरदार इमारती छातीठोकपणे उभ्या आहेत. हे शहर सुमारे चारशे वर्षांपूर्वी स्वीडीश राजा गुस्तावस वासा याने वान्ता नदीच्या मुखावर वसवले. रस्ते लांबलचक सरळ आहेत. शहरात बगीचे व हिरवळीची ऐसपैस पटांगणे आहेत. जागोजाग पुतळे आढळतात. सिबेलीस, मोर्ने, कीव्ही व लिनो या संगीतकार व साहित्यिकांचे भव्य पुतळे लक्ष वेधून घेतात. राजकीय पुढाऱ्यांप्रमाणे साहित्यिकांचे पुतळे जरूर हवेत. मद्रासला मरीनावर तामिळ वाङमयप्रभूंचे भव्य पुतळे नुकतेच वसवले आहेत. पुण्याला गडकऱ्यांचा अर्धपुतळा संभाजी उद्यानात अलिकडेच दिसू लागलाय. मला वाटते मुंबईकरांना साहित्यसेवेचा गौरव करण्याची सवय आहे.

मॅनरहिम हा शहरातील राजरस्ता सरळ लांबसडक आहे. त्यावर विविध देशांचे राजदूतावास आहेत. भारताच्या दूतावासात मुद्दाम जाऊन आलो. त्याच्या दर्शनी खोलीतच शिवछत्रपती व जिजामाता यांची चित्रे पाहून ऊर भरून आले.

शहरात स्टॉकमान, सोकोस व सिटी पुकोव्ह ही तीन प्रचंड बहुमजली विश्वभांडारे (डिपार्टमेंट स्टोअर्स) आहेत. अगदी टाचणीपासून टोणग्यापर्यंत काहीही तेथे मिळते. वरच्या मजल्यावर जाण्यासाठी विजेरी फिरते जिने आहेत. या जिन्यावर पहिले पाऊल टाकताना मनाला एक प्रकारची अस्वस्थता वाटते. पावलाचा व त्याक्षणी समोर येणाऱ्या पायरीचा सांधा साधला की बालीश आनंद वाटे अगदी निशाणबाजीचा नेम साधण्याप्रमाणे !

फिनलॅंडमध्ये शॉपिंग महाग पडते. आपल्या जवळच्या मर्यादित चलनात खरेदी करण्यापूर्वी विचारच अधिक करावा लागतो. कलिंगडे लाल सुंदर होती. सुकान्त सफरचंदे व लाडिक द्राक्षे विपुल होती. या विश्वभांडारामध्ये इतर वस्तू घेण्याचा मोह निग्रहाने टाळला तरी त्यातील एक खाते अटळ होते ते म्हणजे खादी खाते. तेथे एक प्रकारचे स्ट्रॉबेरीचे लुसलुशीत फ्रूट आईस्क्रीम फार लोकप्रिय आहे. हॉटेलात बहुतेक ठिकाणी kala kukoo म्हणजे स्वयं सेवा अशी पाटी असे. कारण वेटर मिळत नाहीत व मिळाले तर परवडत नाहीत.

कोणे एके सायंकाळी हॉटेलात आईस्क्रीम खात बसलो होतो. एक रुबाबदार फिनी इसम तेथे आला व आमच्या मित्राचे रेखाचित्र काढू लागला. सुमारे दोन मिनिटात रेखाचित्र काढून त्याने आमचे-समोर धरले. मुखाचे साम्य समाधानकारक उतरले होते. सलाम करून त्याने दोन फिनिश मार्कांची मागणी केली. एक फिनिश मार्क म्हणजे आपला सुमारे १ रुपया ६० पैसे. एका फिनिश मार्कला शंभर पेनी मिळतात. मागितलेली रक्कम देऊन ती अनाहूत कलाकृती धन्यवादासह स्वीकारावी लागली. पण आता आमच्या मित्राच्या मूळ चेहऱ्याचे व रेखाचित्रातील चेहऱ्याचे साम्य शाबूत होते असे मी कुठल्या तोंडाने म्हणू !

फिनलॅंडमध्ये मनुष्यशक्तीचा फार तुटवडा आहे. म्हणून मागणी व पुरवठा या अर्थशास्त्रीय सिद्धांतानुसार श्रम व सेवा यांना किंमत फार मोजावी लागते. बस ड्रायव्हरलाही सुमारे रु. १२०० पगार

[पृष्ठ ५८ वर पहा]









# ‘दीपावली’ने सादर केलेले परिसंवाद

**शां. शं. रेगे**

‘दीपावली’ ह्या वार्षिक-मासिकास चौवीस वर्षे पुरी झाली. त्याने आता पंचविशीत पाऊल टाकले आहे. माणसाच्या बावतीत हे वय धोक्याचे मानले जाते, पण मासिकाच्या बावतीत अजून तरी तसा प्रवाद कुणी सिद्ध केलेला आढळत नाही. वय जसे वाढते तसतसा वृत्तीत जुनाटपणा मुरत जातो असे म्हणतात. ‘दीपावली’चे जुने रूप आणि नवे स्वरूप पाहिले तर दिवसेंदिवस ते मासिक अधिकाधिक तरुण होत चालल्याचे आढळते. ही काळाबरोबर जुळते घेण्याची वृत्ती ‘दीपावली’त प्रतीत होत असल्यामुळे तिची लोकप्रियता टिकून राहिली आहे (‘अजून मी अ-जून मी’) ह्या दर्जेदार ताजगीचे श्रेय संपादकांच्या कुशल सारथ्यापेक्षा त्यांच्या जागृत सौंदर्यदृष्टीला आणि ती राबवण्याच्या परिश्रमांना मी तरी खचित देईन. वर्षभर सुस्त असलेला संपादक दिवाळी आली की रोपणाई करतो, रंग-रंगोटी गिलावा करतो, स्वच्छता नीटनेटकेपणा आणि आकर्षक सजावटीसाठी पराकाष्ठा करतो. पण दिवाळी संपली की त्याच्या आणि मासिकाच्या अंगात शैथिल्य येते. मग काहीतरी अनाहूत मजकूर, जुने ब्लॉक्स, ढोबळ हेडिंगे, गचाळ (काळी किंवा अस्पष्ट) छपाई आणि मुद्रणदोषाची चक्रवाढ ह्यांनी अंक कसाबसा रेटला जातो. आजचे पुष्कळ मराठी अंक दिवाळीनंतर असे गलितगात्र व अनाकर्षक असतात म्हणून त्यांचा खप वाढत नाही (उलट पडत जातो.) दीपावली, सत्यकथा, पैंजण, बुवा, आणि किस्त्रीम हे फक्त उल्लेखनीय अपवाद. सत्यकथा व किस्त्रीम आर्थिक सामर्थ्य व व्यावसायिक सुखसोयींच्या पाठबळामुळे दर्जा राखून आहे. पण ‘दीपावली’च्या चतुरंगी रेखाबद्ध आकर्षकतेचा डौल मात्र त्यांना प्राप्त झाला नाही. मासिकाचा प्रत्येक अंक हा दिवाळी अंक वाटावा इतके परिश्रम ‘दीपावली’च्या संपादकांव्यतिरिक्त इतर कुणी क्वचितच घेत असतील. प्रत्येक अंकाचे रंगीत वेष्टण, प्रत्येक पानाचे नीटनेटके ‘लेआउट’, प्रत्येक कथेचे निरनिराळे आगळे चित्र, प्रत्येक सदराची आकर्षक मांडणी, प्रत्येक कविता, पानपूरक आणि जाहिरातसुद्धा वाचकाच्या डोळ्यात ठसेल अशी रचना ह्याचा आदर्श पहावयाचा असेल तर ‘दीपावली’चा कोणताही अंक पहावा. अगदी फूटपट्टी घेऊन मोजमाप घेतले तरी तसूभर उणीव कुणाला त्यात आढळणार नाही. ‘दीपावली’ च्या पहिल्या वार्षिक अंकापासून संपादकांनी हे स्वरूपाचे वैशिष्टच अबाधित राखिले आहे ह्याबद्दल त्यांचे हार्दिक अभिनंदन !

पण एवढ्यावरच त्यांच्या कर्तृत्वाचे मूल्यमापन संपवणे म्हणजे त्यांच्या खऱ्या संपादकीय कर्तबगारीला अन्याय करण्यासारखे होईल. पहिल्या वार्षिक अंकाच्या वेळी संपादकीयात त्यांनी सांगितले होते की ही ‘वार्षिकाची अस्फुट कल्पना दीड दोन महिन्यापूर्वी सुचली.’ फक्त दीड दोन महिन्यात तत्कालीन नामवंत लेखकांनी अमृताशी पैजा मारणाऱ्या रसाळ वाङ्मयाचा पुरवठा केल्यामुळे ह्या अल्प मुदतीत दोनशेबत्तीस पानांचा आणि फक्त दोन रुपये किंमतीचा अंक संपादक प्रसिद्ध करू शकले ह्याचे श्रेय त्या लेखकांइतकेच त्यांना आवाहन करणाऱ्या (किंबहुना पिच्छा पुरवून वेळीच साहित्य लिहवून घेणाऱ्या) संपादकांचेही आहे हे नाकारता येणार नाही. पहिल्या अंकातच प्राप्त केलेली दर्जेदार कीर्ती गेल्या चौवीस वर्षात टिकवून ठेवणे किंबहुना वाढवीत नेणे हे किती दुरापास्त आहे ह्याची जाणीव फक्त संपादकांनाच असेल. तशात पहिल्या बारा वर्षातच ह्या एकंदर खटाटोपाचा मनस्ताप



अनुक्रमणिका

असह्य होऊ लागल्यामुळे हा वार्षिक उपक्रम बंद करण्याचा विचार अनेक वेळा त्यांना आला असे कबूल करूनसुद्धा चौदा वर्षांचा वनवास पूर्ण केल्यावरही वार्षिकाचे मासिक करण्याचा 'अव्यवहारी' वेडेपणा संपादकांनी केला आणि हे वेडेपण अंगी मुरल्याने नंतरची दहा वर्षे त्याच झपाटलेल्या रसिकतेने ज्यांनी अनेक साधे सर्वांगसुंदर व खास भरजरी अंक काढून वर्षभर दीपावली साजरी केली त्या संपादकांना (ते नम्रतेने म्हणूनसुद्धा) साहित्यसंपादनात काही समजत नाही असे मानणे म्हणजे बुध्द्या डोळेझाक करून त्यांच्या कर्तृत्वाकडे कानाडोळा करण्यासारखे होईल. एकदीड तप ह्या पापाची भागीदारी दुसऱ्याची आहे असे सांगून स्वत: सोवळे होऊ पाहणाऱ्या संपादकांनी अलिकडच्या तीन चार वर्षांत एका पायावर उभे राहूनसुद्धा हा गोवर्धन पर्वत अजून उचलून धरला आहे हे ज्याला माहीत आहे त्याने तरी त्यांच्या सामर्थ्याचे मूल्यमापन यथायोग्य न करणे अशिष्टपणाचे ठरेल. त्यांच्या ह्या कर्तृत्वाच्या काही पैलूंचे रसभरीत वर्णन ह्या पूर्वीच्या दोन तीन लेखात येऊन गेले आहे. द्विरुक्ती नको म्हणून आता फक्त नियोजित पैलूबाबतच लिहिणार आहे.

'साहित्य-कला-संगम' असे ध्येयविधेय मानणाऱ्या 'दीपावली'ने गेल्या चौवीस वर्षात साहित्य व कला ह्याबाबतीत अनेक आदर्श नमुने रसिकांना सादर केले आहेत (एका वाचकाने 'संगमा'बाबत काही लिहिले जात नसल्याची संपादकांकडे तक्रार केली होती असे म्हणतात तरीही तेच बिरुद अजून कायम आहे) गेल्या चौवीस वर्षात दीपावलीने अनेक साहित्य-रथी अतिरथी महारथींना आपल्या उपक्रमात सहभागी करून वाचकांची आवड पूर्ण केली आणि कित्येकदा तिला कालपरत्वे अनुकूल वळणही लावले. काका कालेलकर, विनोबा, दादा धर्माधिकारी, साने गुरुजी, ज. र. आजगांवकर, महादेव शास्त्री जोशी, न. र. फाटक, महामहोपाध्याय

**........ज्ञानाची लालित्याशी, विचारांची विनोदाशी, जुन्या अनुभवी मतकऱ्यांची नवप्रवाहपतित होतकऱ्यांशी 'दीपावली'च्या परिसंवादांनी घातलेली सांगड हेच त्यांच्या यशाचे गमक....**

पोतदार, श्री. म. माटे, ना. ग. गोरे, अ. का. प्रियोळकर, व श्री. के. क्षीरसागर, मं. वि. राजाध्यक्ष ह्यासारखे पिढीजाद विचारवंत. भाऊसाहेब खांडेकर, मामा वरेरकर, य. गो. जोशी, अनंत काणेकर, आचार्य अत्रे, ना. सी. फडके, पु. ल. देशपांडे, ग. त्र्यं. माडखोलकर, पु. भा. भावे, वामन चोरघडे, ग. ल. ठोकळ, अरविंद गोखले, अच्युत बर्वे, ग. दि. माडगूळकर, व्यंकटेश माडगूळकर, शामराव ओक इत्यादि अनेक अभिजात कथा साहित्यिक, यशवंत, बा. भ. बोरकर, सोपानदेव चौधरी, मर्ढेकर, मनमोहन, राजा बढे, पाडगावकर, बापट, करंदीकर, पु. शि. रेगे, वा. रा. कान्त ह्यासारखे जुने नवे कवी आणि केशवराव भोळे, व. शां. देसाई, पु. रा. लेले, स. आ. जोगळेकर, शांताराम आठवले, द. ग. गोडसे, दुर्गा भागवत इत्यादि संगीत नाट्य संस्कृती लोक साहित्यविषयक अभ्यासू व अनुभवी

**रजतमहोत्सवी**
**वर्षानिमित्त**
**खास लेख**



तज्ञ ह्या सर्वांनी 'दीपावली'त आपल्या प्रकाशित साहित्यकृतींनी मोलाची भर घातली आहे. 'दीपावली' जुन्याची बूज जेवढी राखते तेवढीच नव्यांनाही जवळ करते किंबहुना जुने नवे इथे सहकार्याने व समाधानाने नांदतात असे अपूर्व दृश्य 'दीपावली' त पहावयास मिळते हेंच ते खरे संपादनकौशल्य व संगमाचे प्रतीक.

### निवड-मांडणी-सजावट-विषय यांचे वैशिष्ट्य

पण हे सर्व बरवर चाकोरीबद्ध व इतरही काही मासिक-वार्षिकात आढळणारे साहित्यविशेष आहेत असा कुणाचा समज होईल. पण ज्यांनी कुणी हे अंक समग्र पाहिले असतील त्यांनी त्यातले लेख, कथा, कविता, समीक्षा, चित्रे, व्यंगचित्रे, विनोद ह्यातील निवड, मांडणी, सजावट व विषय ह्यांचे वैशिष्ट्य पाहिले पर त्यांचे आगळेपण त्यांना जाणवल्यावाचून राहाणार नाही. 'दीपावली'ने लालित्याची लोलूपता दाखविली पण त्याबरोबरच सुसंस्कृत वैचारिकतेचे वजन लावून सर्व रसांचा व रसिकांचा समतोल साधला. परिसंवादाबाबत 'दीपावली'ने केलेले प्रयोग तर खचित समन्वयात्मक व अभिनव आहेत. 'दीपावली' पूर्वी व बरोबरही 'मौज' 'साधना' सारखी नियतकालिके आपल्या वार्षिकांकातून परिसंवाद प्रसिद्ध करतात. पण हे सर्व परिसंवाद सामाजिक, राजकीय किंबहुना गंभीर समस्यांवर बुद्धीजड विवेचन करणाऱ्या विचारवंतांच्या सहकार्याने आयोजित केलेले असतात. सामान्यांना त्यांचे सोयरसुतक वाटत नाही आणि किंबहुना ते आयोजित करणाऱ्या संपादकांनाही सामान्य वाचक अभिप्रेत नसतात; पण आपल्या अंकातील प्रत्येक प्रकारचे साहित्य सर्वसामान्य रसिकांच्या आवडीस, पसंतीस व आकलन शक्तीस उतरले पाहिजे हा संकल्प उराशी बाळगून साहित्याची निवड व सजावट करणाऱ्या संपादकांनी आपले धोरण आखले व बदलते ठेवले म्हणून 'दीपावली'सही लोकप्रियता प्राप्त झाली. 'परिसंवादा'च्या बाबतीत 'दीपावली'चे वैशिष्टये म्हणजे ज्ञानाची लालित्याशी, विचारांची विनोदाशी, आणि जुन्या अनुभवी (आग्रही) मतकऱ्यांची नव प्रवाहपतित होतकऱ्यांशी घातलेली सांगड. ह्या संमिश्रतेतून, संघर्षातून व जुगलबंदीतून निर्माण होणारे ध्वनी श्रवण-सुलभ ठरावे ह्यासाठी संपादक आजपर्यंत कटाक्षाने जपत आले आहेत

'दीपावली'तील पहिला परिसंवाद १९५५ च्या वार्षिकात प्रसिद्ध झाला. **'महाराष्ट्र देश सुंदरा'** हे परिसंवादाचे नाव जसे काव्यमय तसेच यथार्थही. ही काव्यात्मकता विभाग विषयातही प्रतीत व्हावी ह्यासाठी त्यांची शीर्षकेही 'मुंबई ग नगरी बड्ड बांका', 'काय बाई पुण्याची तारीफ' इत्यादी काव्यात्मक पंक्तींनी उल्लेखिलेली होती. मुंबईकर मं. वि. राजाध्यक्षांनी मुंबईबद्दल, ग. रा. कामतांनी पुण्याबद्दल, व्यंकटेश माडगूळकरांनी दक्षिण महाराष्ट्राबद्दल, पु. ल. देशपांड्यांनी बेळगांवबद्दल, मंगेश पाडगांवकरांनी कोकणाबद्दल, बा. भ. बोरकरांनी गोमंतकाबद्दल, पु. भा. भाव्यांनी नागपूर वऱ्हाडबद्दल, सोपानदेव चौधरींनी नाशिक खानदेशबद्दल, शांताराम सबनीसांनी बडोद्याबद्दल आणि निरंजन कृष्णांनी मराठवाड्याबद्दल वैशिष्ट्यपूर्ण व मार्मिक माहिती सांगून 'हम भी कुछ कम नहीं' हे सिद्ध करण्याचा खटाटोप केला. हा पहिलाच परिसंवाद असल्यामुळे गोफाची नाडी पकडण्यासाठी फक्त माहितीपूर्ण गांभीर्याची सूत्रे प्रत्येकाने पुरवली असे दिसून येते. ह्या परिसंवादकांपैकी प्रत्येकजण दर साल, मिस्कील व चुरचुरीत लेखन करू शकतो व प्रदेशप्रकृतीही अशा वर्णनासाठी अनुकूल होती हे ध्यानात घेता हा परिसंवाद क्वचित् आणि सांकेतिक विद्युत्पाताखेरीज अधिक नेत्रदीपक ठरू शकला नाही. तरीसुद्धा साहित्यिक वर्तुळात त्याचा त्यावेळी बोलबाला झाला होता.

पुढील वर्षी संपादकांनी **'देश मराठी लोक मराठी मराठीच भाषा'** हा परिसंवाद आयोजित करताना भूभागाकडून त्यातील महाभागाकडे लेखणी वळवली. सारस्वत, कऱ्हाडे, पाठारे प्रभु, कोळी, देशस्थ, कायस्थ प्रभू, मराठा, भंडारी, चित्पावन, वारली ह्या महाराष्ट्रातील अठरापगड जातीपैकी काही प्रमुख व विन्मुख जातींच्या विशेषांची रसाळ माहिती इथे उद्धृत केली आहे. मं. वि. राजाध्यक्ष (सारस्वत), व्यंकटेश माडगूळकर (देशस्थ), वसंत सबनीस (कऱ्हाड), बाळ मेढेकर (कायस्थ), रणजित देसाई (मराठा), बा. दा. पडवळ (भंडारी), शांताराम जोग (चित्पावन) हे ह्या परिसंवादातले 'जातीवंत' लेखक व प्रा. अनंत काणेकर (कोळी), शां. शं. रेगे (पाठारे प्रभू) व बाळ सामंत (वारली) हे ह्या परिसंवादाचे विजातीय उपरे पण 'सहवासी' लेखक. ह्या सर्वांनी आपापल्या जातीची माहिती मोजकी, वैशिष्ट्यदर्शक आणि मार्मिक शैलीने वर्णन केली आहे. मागच्या वर्षापेक्षा हा परिसंवाद अधिक आटोपशीर, सूत्रबद्ध व हलकाफुलका झाला. विशेषतः ह्या संवादाने कोणताही 'जातिवंत' वाचक दुखावला तर गेला नाहीच उलट 'प्रभु प्रभात'सारख्या मासिकाने 'दीपावली'कारांचे अभिनंदन केले.

### पुढाऱ्याना लिहिते केले

१९५९ साली (मध्ये विश्रांती घेऊन) तिसरा परिसंवाद प्रगट झाला. **'माफ करा हं काहीतरी गैरसमज होतोय्'** अशा अगडबंब व अनाकलनीय (पण आकर्षक) शीर्षकाने घोषित केलेला हा परिसंवाद पूर्वीपेक्षा निराळा होता. आता साहित्यिकांना वगळून महाराष्ट्रातील तमाम बड्या लोकांना 'दीपावली'च्या व्यासपीठावर आमंत्रित करण्यात आले होते. मोठ्या माणसाच्या जीवनात काही विचित्र घटना निर्माण होतात आणि त्यांचे निवेदन किंवा वर्णन मुखोमुखी होत असताना त्याबद्दल गैरसमज वाढत जातात. अशा काही गैरसमजांचे निराकरण त्या त्या व्यक्तींनी करावे व अखेर सर्व काही गोड व्हावे अशी संपादकांची ह्या परिसंवादामागे भूमिका होती. पण साहित्यिक जसे हुकमी सर्वस्पर्शी साहित्य लिहू शकतात तसे हे पुढारी करू शकत नाहीत. किंबहुना हे गैरसमज वाढावे अशी काहीची अपेक्षा तर काहीची नसत्या लफड्याची उजळणी नको म्हणून टाळाटाळी. एकूण काय फक्त नजिकचे, भोळेभाबडे व खरोखरीचे निरपराधी आणि विमुक्त गृहस्थ फक्त उभे राहिले आणि थोडक्यात त्यांनी आपली भूमिका स्पष्ट करून रजा घेतली. ह्या थोर मंडळीत काकासाहेब गाडगीळ, डॉ. ना. भा. खरे, बालगंधर्व, बाबुराव पटेल, स्नेहप्रभा प्रधान, मोतिरामशेठ टोपीवाले, प्रबोधनकार ठाकरे, दत्तु बांदेकर, पॉली उमरीगर, ज्योतिषी म्हापणकर आणि रॉय किणीकर हे होते. व्यवसायक्षेत्र, सामाजिक दर्जा, वय, कीर्ती ह्याबाबत सहभागकात वैविध्य असूनही हा परिसंवाद फारच त्रोटक व विस्कळित झाल्यामुळे रंगला नाही.

१९६० साली **'मराठी माणूस—१९२० ते १९६०'** हा महाराष्ट्राच्या इतिहासातील चाळीस वर्षांच्या उल्लेखनीय कालखंडाचा 'तऱ्हेवाईक' इतिहास ध्वनित करणारा परिसंवाद प्रसिद्ध झाला. हा परिसंवाद मात्र काटेकोरपणे सीमारेखित करून विभागला गेल्यामुळे साकल्याने तो जेवढा मार्गदर्शक ठरला तेवढाच विभागशःही त्यातले लेख स्वतंत्रपणे रंजक व वैशिष्ट्यपूर्ण ठरले. प्रत्येक भाग त्या त्या क्षेत्रातल्या अनुभवी, मुरब्बी किंवा अधिकारी व्यक्तीवर सोपवल्यामुळे परिसंवादाला दर्जाबरोबर एक प्रकारची अधिकृतताही प्राप्त झाली. काकासाहेब गाडगीळांनी आपल्या चुरचुरीत शैलीने महाराष्ट्राच्या सामाजिक व राजकीय 'वाटचाली'चे यथार्थ दिग्दर्शन केले. प्रा. मं. वि. राजाध्यक्षांनी 'मनोरंजनाचे जुने व नवे थाट' वर्णन करताना साहित्य, आणि नाट्यक्षेत्रातील निवृत्ती प्रवृत्तींचा (कुप्रवृत्तींचाही) मनोरंजक व मार्मिक आढावा घेतला. 'मराठी माणसाने आपल्या उदरविस्ताराची हेळसांड केल्यामुळे 'महाराष्ट्र मागे पडला' हे सिद्ध करणारा श्री. शां. शं. रेगे ह्यांचा 'कशासाठी पोटासाठी' हा चुरचुरीत व खटचाळ लेख (इति संपादक) जितका माहितीपूर्ण तितकाच 'जिव्हाग्री' लागणारा आहे. शामराव ओक हे तर पोशाखाच्या बाबतीत रसिक अद्यावत् व शिस्तबद्ध. त्यांनी '(मर्दानी) वेषाच्या नाना कळा' खेळकर शैलीत सांगताना महाराष्ट्राची 'अठरापगड' जनता अखेर कशी बोडकी झाली ह्याचे मार्मिक वर्णन

ओगले*



बरणींत पदार्थ नक्कीच आकर्षक दिसतो













केले. सौ. नलिनी सुखठणकरांनी '(जनाना) वेषाच्या नाना कळा' थोडक्यात पण यथातथ्य वर्णन करताना केशवेष दागिने ह्याबाबतची बदलती आवडनिवड दिग्दर्शित केली. श्री. ज. जोशी ह्यांनी मराठी 'निवासा' चे धावते परिवर्तन 'सहकुटुंब सहपरिवार' ह्या लेखात केले आहे. ते जुने वाडे, त्या सास्वा-सुना, एकत्र कुटुंबातील ती शिस्त, पाव्हण्यारावळ्यांची ती वर्दळ संपून दोन खणी खोल्यातल्या अलिकडच्या विभक्त, बेशिस्त व विस्कळित कुटुंबजीवनाचे त्यांनी काढलेले चित्र अत्यंत हृद्य आहे. सारांश, ही लेखमाला (किंवा परिसंवाद) सर्वथा आटोपशीर, सूत्रबद्ध व सर्वस्पर्शी होऊनसुद्धा जड झाली नाही ह्याचेश्रेय लेखकांइतकेच त्यांना मार्गदर्शन करणाऱ्या संपादकांनाही आहे.

**बरे झाले देवा...**

लौकिक जीवनात यशस्वी झालेले सत्पुरुष हे यशस्वी असतात म्हणून सुखी असतात असा आपला समज असतो. पण काही यशस्वी लोकांच्या सुप्त महत्वाकांक्षा विफलित झालेल्या असतात. ह्या अप्राप्त महत्त्वाकांक्षांमध्ये ते यशस्वी झाले असते तर त्यांच्या जीवनास कसे निराळे वळण लागले असते ह्याचे निर्भीड व खेळकर वर्णन करण्यासाठी 'दीपावली'ने १९६२ साली महाराष्ट्रातील कलावंत, राजकारणी, साहित्यिक, विचारवंत व क्रीडा कलाप्रेमी व्यक्तींना आवाहन केले. ह्या आत्माविष्कारातून एक मनोरंजक परिसंवाद तयार झाला. त्याचे शीर्षकही 'बरे झाले देवा' असे देऊन त्याचे लालित्यपूर्ण स्वरूप पक्के केले गेले. ह्या परिसंवादात आचार्य अत्र्यांनी वकील होण्याच्या आपल्या सुप्त आकांक्षेचे, महामहोपाध्याय पोतदारांनी आपल्या (असफल) योजना पांडित्याचे, पु. भा. भाव्यांनी आगगाडीचा ड्रायव्हर, सैनिक, वकील, इत्यादि आपल्या आकांक्षांचे, उदयशंकरने चित्रकलेतून नृत्यकलेकडे केलेल्या वाटचाचे, सरोजिनी बाबरांनी 'डॉक्टर झाले पण दवाखाना काढू न शकल्याच्या खंतीचे, चित्रकार आचरेकरांनी मॉडर्न आर्टच्या ध्यासाबाबतच्या धोकेबाज उपक्रमांचे, प्रकाशक देशमुखांनी बलशाली देशाच्या हुकूमशहा नेत्याचे केलेले स्वप्नरंजन, क्रिकेटपटु माधव मंत्री ह्यांचे डॉक्टर होण्याचे स्वप्न—ह्या सर्व आकांक्षांपायी घडलेले उन्माद, प्रमाद आणि विसंवाद ह्यांचे वर्णन प्रत्येकाने निश्शंकपणे (काहीशा टोचणीने पण अधिकशा समाधानाने) करताना क्षणभर आपले प्रचलित वय, सामाजिक दर्जा, कीर्ती व कर्तृत्व बाजूला ठेवल्यामुळे ह्या परिसंवादाला आपोआपच सहजता व अपेक्षित खेळकरपणा प्राप्त झाला आहे.

आतापर्यंत 'दीपावली' वार्षिकात 'पुच्छ प्रगती' करणारा 'परिसंवाद' १९६५ साली जणु अचानक झपाटला. कदाचित तीन वर्षांच्या विश्रांतीमुळे त्याला सामर्थ्य प्राप्त झाले असावे. कदाचित, मराठी साहित्यातील 'देखणे' व विख्यात साहित्यिक त्या वर्षी सहभागी होणार होते किंवा कदाचित विषयही वाचकांना (पृष्ठे चाळताना) थवकविणारा होता. म्हणून की काय 'दीपावली'चा हा पाठराखा परिसंवाद ह्या वर्षीच्या अंकात प्रारंभीच येऊन धडकला. 'परदेशात मला भेटलेली अविस्मरणीय स्त्री' हे सूचक, (काहींच्या मते जाहिरातवजा) आकर्षक असे शीर्षक देऊन संपादकांनी प्रकृति-पुरुषांच्या छायाचित्रांसह हा परिसंवाद सादर केला. श्री. अरविंद गोखल्यांना अमेरिकेत भेटलेली मार्जोरी वेट्झर, अच्युत बळ्यांना लंडनच्या एअर टर्मिनलवर भेटलेली शहीन वासीफ, सदानंद रेग्यांना नॉर्वेमध्ये भेटलेली आस्वी, रमेश मंत्र्यांना लंडनमध्ये भेटलेली वर्नी श्रेयमाँ, जयवंत दळवींना न्यूयॉर्कला भेटलेली (म्हातारी) कॅथरीन्, दिलीप चित्र्यांना इथियोपियात भेटलेली मेरियल, प्रा. अनंत काणेकरांना युगोस्लाव्हियाच्या वाटेवर भेटलेली लिली लिटल्फील्ड, वसंत देशमुखांना लंडनमध्ये भेटलेली अनामिका, शंकर सारडांना बॉस्टनमध्ये भेटलेली सुझी, ह्या सर्व स्त्रिया त्या त्या प्रवासी साहित्यिकांना अविस्मरणीय कां वाटल्या ह्याचे कथन ह्या साहित्यिकांनी केले आहे. ह्या साहित्यिकात सर्वात प्रौढ काणेकर व सर्वात तरुण दिलीप चित्रे. साहजिकच दोघांच्या (आणि वयोमानाप्रमाणे इतरांच्या) कथनात कमी अधिक आत्यंतिकता दिसते. ह्या परिसंवादाचा विषय तसा धोक्याचा—प्रतिष्ठेला आणि कौटुंबिक शांततेला धक्का देणारा होता. संपादकांनी ह्या लेखकांना आव्हान दिले होते. (लेकांनो, कथात मुक्तशृंगाराची स्वप्तरंजने करता नाही का! आता पाहू खरे सांगता का) पण लेखक भलतेच इरसाल आणि मुत्सद्दी. त्यांनी लेखणी सरसावली आणि सावधगिरीने कथन केले. विचाऱ्या एक दोघांना म्हाताऱ्याच भेटल्या. काहींना वेळ फारच थोडा आणि भेट वाटेत किंवा एअरपोर्टवर. मात्र रमेश मंत्र्यांनी मुक्याचा व्यवहार सांगितला आणि दिलीप चित्र्यांनी (कुटुंबाच्या सौजन्याने) थोडीशी स्पष्टोक्ती केली. बस्स! एकूण काय ह्या परिसंवादाचे कोणाला (लेखकाला कसं बनविलं म्हणून आणि वाचकाला हे सगळं कथपेक्षाही अळणी लागले म्हणून) सोयरसुतक विशेष वाटले नाही असे वाटते.

गेल्या चौवीस वर्षात 'दीपावली'ने हे सहा परिसंवाद सादर केले. प्रत्येक परिसंवादाचा विषय निवडताना त्याला प्रातिनिधिक स्वरूप असावे, त्याचा लेखक तज्ञ, अनुभवी किंवा अधिकारी असावा, व्यक्तीमत्वाने, कर्तृत्वाने व शैलीने तो प्रसिद्ध असावा, विषयाची व्याप्ती आणि खोली सर्वस्पर्शी व कुतुहलपूर्ण असावी इत्यादि निकष कटाक्षाने पाळले हे वरील विवेचनावरून सहज ध्यानात येईल. परिसंवाद चुरचुरीत असावा पण थिल्लर नसावा (इतरांनी 'दीपावली'चे अनुकरण करून नंतर परिसंवाद आखले पण ते योजनेच्या अभावी सपक झाले) हे पथ्य विशेष पाळल्यामुळे ह्या उपक्रमाचे कधी हंसे झालेले नाही. 'दीपावली'चा परिसंवादाबाबत सामान्यतः त्रैवार्षिक पाळणा असतो. गेल्या परिसंवादाला तीन वर्षे झाली. यंदा काय नवीन, की 'बस्स दो या तीन'!

• • •

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका



## उत्कट आशय, नेटका प्रयोग

विषकन्या, स्वामिनी, पडछाया ह्या नाटकांनंतर "नाटककार" म्हणून दीर्घकाळ अज्ञातवासात गेलेले श्री. पुरुषोत्तम भास्कर भावे हे 'नाटककार' भावे म्हणून पुन्हा एकदा मराठी नाटचरसिकांपुढे वेगाने व आवेगाने येत आहेत असे दिसते. सौभाग्य, पद्मिनी, ब्रह्म घोटाळा आदि नाटके त्यांनी हातावेगळी केली असून अन्य काही नाटकांना त्यांनी हात घातला असल्याचे कळते. कथाकार, कादंबरीकार, निबंधकार, पत्रकार आणि चित्रपट कथालेखक आदि विषय यांनी सन्मानाने व स्वकर्तृत्वाने संपादन केले आहेत. 'सौभाग्य' हे भावे यांचे नवे नाटक आज बऱ्याच कालानंतर रंगमंचावर आले आहे. आणि नांवाप्रमाणे ते भाग्यशाली ठरेल असे म्हणता येण्यासारखे खासच आहे. 'संगम' ह्या कथेवर त्यांनी काही वर्षापूर्वी 'सौभाग्य'ची चित्रपट कथा लिहिली. ग. दि. माडगुळकर, बेबी शकुंतला, चित्तरंजन कोल्हटकर आदि मंडळींनी तो चित्रपट यशस्वी केला. 'सौभाग्य' हे नाटक त्याच पटकथेची नाटचरूप व काहीशी सुधारून वाढवलेली आवृत्ती आहे. ह्या नाटकाची कथा तशी सर्वपरिचित अशी आहे, असे मानूनही ती हे तिसरे रूप कां घेते आहे याची काही चिकित्सा व्हावी असे वाटते. नाटकाचा विषय (कथा जुनी असूनही) जुना नाही. तो चिरंतन आहे. चिरनव आहे. आजच्या बदलल्या समाजस्थितीत तर तो नवाच आहे. कौटुंबिक दायित्व, शिक्षण, भोवताली नोकरीमुळे येणारे स्त्री पुरुष संबंध, त्यातून निर्माण होणारी गुंतागुंत, प्रेम प्रकरणे, प्रेमभंग, त्यांचे विवाहावर होणारे परिणाम, विवाहोत्तर होणारे मानसिक संघर्ष आदि अनेक गोष्टींचा विचार केला तर 'सौभाग्य'ची मूळ कथा जुनी झाली असे म्हणता येणार नाही. अविनाश-विमलची प्रीती सफल होत नाही. पळून जाऊन पंजाबी माणसाशी लग्न करणाऱ्या वहिणीच्या वर्तनाचे उट्टे तिच्यावर निघते. ती आपल्या प्रेम विषयाबद्दल 'तरल' वृत्तीची, उत्कट भावनेची असल्याने पिशवीत चार पातळे कोंबून अवीकडे येते. पण गरीबीतून लढत झगडत, एकाकीपणे पण हुशारीने आयुष्य काढणारा अवी 'साथ' करीत नाही. व्यवहाराच्या खडकावर प्रीत फुटते आणि उरी फुटलेली विमल परत घरी येते. आणि आई-वडिलांनी ठरवलेल्या मुलाशी लग्न करायला सिद्ध होते. विकल झालेल्या विमलला तिची आई जो उपदेश करते तो भाषा, विचार, भावना ह्या दृष्टीने एक पताकास्थान म्हणून मानण्यासारखा आहे. दुसऱ्या अंकातील अशांत, अस्वस्थ विमल, तिला अविनाशच्या पत्रांनी येणारी व्याकुळता, अहिल्ये संबंधात कानी येणारे व विद्ध मनाला अधिक विंधून जाणारे आरोप ह्यामुळे विमलचे भावजीवनच जणु कोसळते. पण आपल्या संयमी, खोल आणि खऱ्याखुऱ्या पुरुषार्थी जीवन श्रद्धेने अनंतराव कोसळणाऱ्या विमलला आधार देतात. तिला नुसताच आधार मिळत नाही तर एक नवीन जीवनदृष्टी लाभते. ती तिला शांत करते. निर्भय करते. तृप्तीने न्हाऊन काढते. अविश्वासाने विश्वास मिळत नाही. बळजबरीने प्रीती मिळत नाही. जी भिते ती प्रीती असत नाही असा एक नवा बोध तिला होतो. त्या पार्श्वभूमीवर तिचे नंतरचे सारे जीवन दीप्तीमय होते. समर्थ होते. अविनाश तिच्याच गावी यतो. तिच्याच वाड्यात राहतो. तिला जुन्या प्रीतीची स्मरणे देत राहतो. पण अमृत गवसलेली विमल स्थितप्रज्ञ स्त्रीसारखी वागते. अविनाशची प्रेयसी असलेली विमल संपली असून एक नवी तृप्त, तेजस्वी, पतिपरायण गृहिणी त्याला दिसते. नवऱ्याच्या संतापापासून ती अविनाशचे रक्षण करते व अहिल्येच्या मुलीशी त्याचे लग्न लागते.

हे नाटक व्यापक, उदात्त, खोल व भव्य आशयाचे नाटक आहे. चिरंतनाचा स्पर्श त्याला होतो तो ह्यामुळेच. लग्नपूर्व (तथाकथित) लफड्याबाबत विवाहोत्तर काळात पति-पत्नीने उदार, सहानुभूत भूमिका घेण्याची गरज सार्वकालीन आहे असे मला वाटते. पण केवळ नाटकाचा आशय मोठा व सार्वकालीन असून चालत नाही. नाटचप्रदर्शन प्रसन्न व तर्कसंगत असावे लागते. घटना घडाव्या लागतात. समर्थ आशयाला साजेशी समर्थ भाषा लागते. समर्थ संघर्ष लागतो. 'सौभाग्य' नाटकात हे आहे की नाही ? सर्वच गोष्टी नाटकात दाखवता येत नाहीत. माध्यमालाच काही अंगभूत मर्यादा असतात. अविनाश-विमल यांच्या प्रेमसंबंधाची उत्कटता 'एस्टॅब्लिश' व्हायच्या आतच चित्रपट पद्धतीने भरभर चित्रे पालटत जातात व अविनाश-विमलच्या प्रवेशात अविनाशचा 'डिफेन्स' हा लंगडा पडतो. प्रेम हे बेहिशबी असतं हे गृहीत धरलं तरीही अविनाश ज्या घात-आघातातून आकारत होता, त्या प्रक्रियेत त्याचा 'डिफेन्स' हा सुद्धा तसा तर्कसंगत वाटावा. पण त्यातूनच नाटच फुलते. ह्या अंकात 'आय्‌रनी'चा उपयोग भाव्यांनी चांगला केला आहे. विमलला पहायला येणाऱ्या देशमुखांच्या स्वागताचा हार, पेढे आदि गोष्टींसाठी धावाधाव करतो. अविनाश, चहाचा ट्रे आणणे आदि गोष्टीही तो करतो. ह्या गोष्टी पहात असताना एकीकडे कीव येत होती तर एकीकडे सहानभूती दाटून येत होती. पहिला अंक बराचसा 'सिनेमॅटिक' वाटला. त्यातल्या 'सुई दोरा' वगैरे प्रसंगाबाबत आजच्या संदर्भात मतभेद होतील. पण तिची कुचंबणा दाखविण्याइतपत तो प्रसंग परिणामकारक ठरतो. दुसऱ्या अंकातील अनंतराव (दादा) व विमल यांचे शय्यागारातले प्रसंग उत्कटतेने, काव्यात्म शैलीने पण संयमाने लिहिले आहेत. सांडलेले कुंकू तो कागदात भरतो. त्या कागदात विमल-अविनाशचे चित्र असते ते अनंतराव पाहतात. पत्र चोळामोळा करून खिशात घालतात ते कां ? ते तिला आलेले पत्र आहे हे कळूनही ते ठेवतात ? फाडून टाकीत नाहीत ? पुढे ते वाचलेलेही नाही असा उल्लेख आहे. मग ते ठेवून तरी कां दिले ? तरीही एकूण

कुंकवाचा प्रसंग हे ह्या नाटकातले दुसरे पताकास्थान आहे असे मला वाटते. दुसऱ्या अंकातील खल पुरुष 'अष्टपुत्रे' हा मात्र लेखन व अभिनय-पात्र योजनादृष्ट्याही फार सांकेतिक वाटला. अर्थातच त्याला वाव कमी आहे हे ठीकच झाले. तिसऱ्या अंकातील अनंतरावांची गैरहजेरी, अहिल्येचे उकललेले गूढ, त्या गूढामागची एक 'पुरुषार्थी' उत्कटता, अविनाशचा अतिप्रसंग, त्याला होणारे शासन व शेवटी झाली येवढी शिक्षा पुरे म्हणून सरलशी त्याचे जुळवलेले नाते ह्या साऱ्या गोष्टी एका वेगळयाच विश्वात घेऊन जातात. हे सारे नाटक घडत असताना आपल्या फटकळ, रांगड्या पण स्नेहशील अंतःकरणाने ह्या नाटकाला रंगत देणारा काका आपल्या स्मरणात राहतो. ह्या नाटकाला रूढ अर्थांनी नायक नाही, तसाच खल नायकही नाही. ह्या नाटकातली 'व्हिलनी' परिस्थितिजन्य आहे. माणसे म्हणजे शेवटी पटावरची प्यादी ठरतात. पण ते ठरत असताना अखेर माणुसकीचे, भव्यतेचे, उत्कटतेचे दर्शन घडवून जातात. इथे प्रत्यक माणूस त्या 'परिस्थिती'च्या चरकात उगाचच 'डागळला' गेलेला आहे. अनंतराव, अविनाश, अहिल्या, विमल ही यातली प्रमुख पात्रे ! डागळली गेली त्याचा काच त्यांना सहन करावा लागला. तशी ही सारीच सरळ, सत्प्रवृत्त माणसे ! इथेच हे नाटक मोठे ठरते. शेवटी माणसांच्या ह्या जगात-संसारात एकमेकांना समजून घेणे व क्षमा करणे येवढेच एक त्रिकालावाधित सत्य आहे. नसलेले कलंक माथी घेऊन क्वचित माणसाला मिरवावे लागते. अशा वेळी विनाश टाळण्यासाठी समजूत व क्षमा उपयुक्त ठरते. काकांचे पात्र ही नवी भर. ती 'रिलीफ' देण्यासाठी उपयोगी पडते. **प्रा. मधुकर तोरडमल** ती भूमिका वठवतातही चांगली. पण तरीही ती व्यक्तिरेखा नाट्य वस्तूशी एकात्म झाल्यासारखी वाटत नाही. 'प्राचार्य' हेही पात्र नसते तर ? माझ्या मते चालले असते. हे नाटक मुख्यतः 'नायिकाप्रधान' आहे असे माझे मत. **भावना** ही एक गुणी अभिनेत्री आहे. पहिल्या अंकातील अविनाशच्या खोलीतल्या संघर्षात ती कमाल करते. विविध भावदर्शनाची मागणी तिच्याकडून नाटक करते. ती ते ते प्रसंग समरसून वठविते. प्रणयिनी, रमणी, माता आणि शेवटी थोर मानिनी-गृहिणी ह्या सर्व भूमिका ती चांगल्या प्रकारे सादर करते. शेवटच्या अंकातील-अविनाश तिचा हात धरतो तो प्रसंग-याहून अधिक समर्थपणे तिने वठवायला हवा असे मला वाटते. (तुलना टाळतो) **कमलाकर टाकळकर** ह्यांचा अनंतराव (दादासाहेब) चांगला वाटला. टाकळकरांनी भूमिकेला न्याय दिला आहे. त्या मानाने **नरेन् चव्हाण** (अविनाश) हे उत्कटतेत काहीसे उणे ठरतात. त्यांच्या कामात अजून सहजता व भावनास्पर्शित्व येणे आवश्यक वाटते. काही प्रवेशात ते अपेक्षा उंचावतात हे मात्र खरे ! **प्राचार्य पंडित** (नाना भोर) **विमलचे आई वडील** (दीनानाथ लाड व मंगला पर्वते), **अष्टपुत्रे** (शशीकांत महाडिक) आणि सरलमनस्क सरल (शीला वालावलकर) **अहिल्या** (सौ. अनुराधा भागवत) ह्या भूमिका ठीकठाक वसविलेल्या आहेत. भाषेचे अनेक चांगले नमुने ह्या नाटकात आहेत. काही उपहासगर्भ उपमा मात्र फारच बोचऱ्या वाटल्या (विशेषतः लिपस्टिकचे संदर्भातली).

श्री. भावे यांचे हे पुनरागमन मराठी रंगभूमीचे दृष्टीने भाग्यशाली ठरेल अशी पदचिन्हे ह्या 'सौभाग्य'त निश्चित आहेत असे मला वाटते. सखाराम भावे यांचे 'जॅक नाइफ' नेपथ्य नाटकाच्या 'सिनेमॅटिक' गतीला साहाय्यभूत ठरते. एरव्ही टेंपो जरा कमीच.

## बंडावरचे नाटक, पण बंड नाही !!

प्रा. ना. सी. फडके यांच्या **'अखेरचे बंड'** ह्या कादंबरीवर आधारलेले श्री. मधुसूदन कालेलकरलिखित **'हे फूल चंदनाचे'** नाटक रंगभूमीवर आले आहे. कादंबरीवरून नाटके लिहिण्याचा प्रयोग नवीन नसला तरीही एका लेखकाच्या गाजलेल्या कादंबरीवरून दुसऱ्या गाजलेल्या नाटककाराने नाटक लिहिण्याचा प्रयोग मात्र काहीसा आगळाच म्हणावा लागेल ! **'अखेरचे बंड'** ही फडके यांची कादंबरी अनेक कारणांनी गाजली. त्यातले एक कारण असे देता येईल की, त्यातली मध्यवर्ती व्यक्तिरेखा 'बालगंधर्व' ह्या 'लीजंड'वर आधारित होती. आज गंधर्व गेले असले तरी गंधर्वांचा चांगला व नंतरचा बरा काळ पाहिलेली माणसे अजून हयात आहेत. त्यांचे संगीत अजून कानात तरळते आहे. **'हे फूल चंदनाचे'** नाटक लिहिताना कालेलकर यांनी 'बाल गंधर्व' (वा तो कल्पित कलाकार) दिवंगत झाल्यानंतरचे नाट्य उपयोगात आणले आहे. रोहिणी ही नानांची (नटवर्यांची) मोठी मुलगी. नानांची कीर्ति गेली नाही पण द्रव्य गेले. कंपनीचे सामान गहाण पडले. आणि मृत्यूच्या दारात गेलेल्या नानांना रोहिणीने वचन दिले "भास्कर व रेवाला अंतर देणार नाही. त्यांचे सारे व्यवस्थित करीन". त्या वचनाच्या पूर्तीसाठी आपल्या मनातल्या साऱ्या कोमल भावना मारून रोहिणी कार्यरत राहते. त्यासाठी सर्वशक्ती पणाला

---

### कै. गोपाळकृष्ण भोबे स्मारक निधी

कै. गोपाळकृष्ण भोबे स्मारक समितीतर्फे मे १९६८ मध्ये एक कार्यक्रम आयोजित केला होता व त्यावेळी एक स्मरणिकाही प्रसिद्ध करण्यात आली होती. समितीने एकंदर रु. २४,८२३ जमविले. खर्च बजा जाता राहिलेल्या रु. १८,६८३ ह्या रक्कमेचा खालीलप्रमाणे विनियोग करण्यात आला :—

| | |
|---|---|
| शिष्यवृत्ती फंड | रु. ५,०००/- |
| कुटुंबियांस | रु. १३,६८३/- |

रामकृष्ण नायक
चिटणीस
कै. गोपाळकृष्ण स्मारक समिती

---

लावते. वारंवार थकते. वैतागते; पण पुन्हा उभी राहते. अखेर ज्या क्षणी ह्या साऱ्या पाशातून मुक्त होऊन आपल्या प्रियकराला भेटण्यासाठी ती बंगलोरला जायला निघते त्याक्षणी नियती पुन्हा रेवाच्या रूपाने तिचा दावा साधते आणि आपल्या दिल्या वचनासाठी 'आई' होऊन, रेवाला आपल्या प्रियकराच्या स्वाधीन करून रोहिणी शाळेकडे निघून जाते. अच्युतसाठी सारे पाश तोडून त्या बंधनातून मुक्त होऊन रोहिणी निघून जाऊन **'अम्ब्रेरचे बंड'** करते असे कादंबरीत दाखविले आहे. परंतु ह्या नाटकात कादंबरीतले हे चित्रण वदलले असले तरी नाटयांतर्गत तर्कसंगतीचे दृष्टीने तेच अधिक बरोबर वाटते. रोहिणीचे मन बाप्पाला समजते, भार्गवरामला (नानांच्या कंपनीचा मॅनेजर) उमजते पण तिच्या पाठीला पाय लावून आलेल्या रेवा-भास्करला समजत नाही. आणि रोहिणी मात्र अखेरपर्यंत नानांना दिलेल्या वचनाखातर त्यांची पाठराखण करीत राहते. रेवाला एका प्रसंगातून वाचविण्यासाठी ती नटराजाची सोन्याची मूर्ति देते. नानांचे 'ग्लॅमर' रेवाने पाहिले नसते. भास्करने अनुभवले नसते. उलट त्या 'ग्लॅमर'ने आपल्या आयुष्याचा उभा दावा मांडला असून रोहिणीच्या प्रेमाने आपण पंगु झालो आहोत ही त्यांची कैफियत असते आणि मानसशास्त्रदृष्टया ती चुकीची नाही. रोहिणीच्या मायेने ती वारंवार उभी राहतात हे खरे असले तरी त्यातूनच ती विघडतही जातात आणि मग सत्प्रवृत्ती व वचनपालन ह्या दोन गोष्टींनी बांधलेली रोहिणी व रेवा भास्कर यात एक दरी उभी राहते. ह्या 'सिच्युएशन'मध्येच एक अंगभूत नाटय आहे. रेवा-अच्युत संबंधाची नाजुक वीण ते नाटय वाढवीत नेते आणि रोहिणी–अच्युत मीलनाच्या क्षणी अच्युतच्या ध्यासापोटी डोके फोडून घेणाऱ्या रेवाला झालेल्या भ्रमातून रोहिणीची शोकांतिका जणु स्रवत जाते. ती शोकांतिकाच अधिक तर्कगत वाटते. कालेलकरांनी घेतलेले हे स्वातंत्र्य नाटयदृष्टया नाटकाला व रोहिणीलाही एका उंच स्तरावर घेऊन जाते. तसेच 'बाप्पा' ही कालेलकरी निर्मिती ! ही निर्मिती केवळ धंद्यावर दृष्टी ठेवून केली आहे हे म्हणणे बरोबर नाही. नानांच्या मृत्यूनंतरच्या 'वाताहती'वर जर हे नाटक आधारले आहे, तर त्या काळात दुकानातली 'नटराजाची' मूर्ती पुन्हा विकत घेऊन नानांकडे आणून देणारा मॅनेजर भार्गवराम व नानांवरील असीम श्रद्धेने रोहिणीच्या पाठीशी 'माणसा'सारखा (देवासारखा मुद्दाम म्हणत नाही) उभा राहणारा बाप्पा ह्या दोन्ही व्यक्तिरेखा नाटकाला उपकारक ठरतात. नाना जर येवढे मोठे नट होते तर त्यांच्या कीर्तीने भारावलेली चार दोन माणसे तरी त्या कुटुंबाच्या पाठीशी उभी राहणे तर्कसंगत नव्हे काय ! बाप्पाचे 'कानडी' रूप महत्त्वाचे नाही. त्याचे मानवी रूप जेव्हा आविष्कृत होते तेव्हा बाप्पा हे पॅच ठरत नाही. बाप्पाचे आसू तुमच्या माझ्याही डोळ्यात तरळतात. बाप्पाची निर्मितीही कालेलकरी यशाचीच मी गमक मानतो. 'नीलिमा' हे पात्र मात्र काही खास वाटत नाही. भास्करच्या अनेक गुणां (?) पैकी एकाचे दर्शन तिच्या रूपाने घडते व रोहिणी तिचाही 'नतिक' भार शिरावर घेते. पण पुढे तीही जेव्हा गुण उधळते तेव्हा तिच्याविषयीची सहानुभूती गळून जाते. भास्कर मग फारसा दोषी होता असेही वाटेनासे होते ! परिणामाचे दृष्टीने हे गौणत्व वाटते. नानांच्या 'कथा' बऱ्याच ऐकायला मिळतात. अनेक पात्रांच्या तोंडून मिळतात. पण मधूनच अशा एखाद्या स्वप्नदृश्यांचा वापर करून नानांच्या त्या 'ग्लॅमर'चा प्रत्यय प्रेक्षकांना देता आला तर नाटकाची परिणामकारिकता वाढेल असे मला तरी वाटते. पार्श्वसंगीताचा, नाटयगत गाण्यांचा सुरेख व प्रसंगोचित उपयोग कालेलकरांनी केला आहे. तरीही ही सूचना रोहिणीच्या तोंडी त्यांना मिळणाऱ्या वन्समोअरचे उल्लेख आहेत. अशाच एखाद्या प्रसंगाचा उपयोग कां करू नये ? रांगणेकरांच्या **'आले देवाजीच्या मना'** व **'हे फूल चंदनाचे'** ह्या दोन नाटकात काही साम्यस्थळे जाणवत असली तरी दोन्हीही शोकांतिकांचे पायाभूत विषय भिन्न आहेत ? 'दिवा जळू दे'मध्येही 'बडी दीदी' आहे. ह्याही नाटकात ती आहे. पण तरीही ह्या नाटकाचा विषय एका वेगळ्या स्तरावर नेतो. नाटकातले संवाद फारच वहारीचे. सुभाषितवजा व उपरोधिक अशी वाक्ये भरपूर ! ती टाळ्या-दाद घेतात. रंगत वाढते. शरद तळवलकर हे हंशेही घेतात व आसूंची दादही घेतात. रेवा (नलिनी चोणकर) ह्या शेवटच्या अंकात बहार करतात. रोहिणी (लता काळे) विविध भावछटा चांगल्या व्यक्त करतात. बोलणे अजून सहजसुंदर वाटायला हवे. भार्गवराम (गोविंद कुलकर्णी) वाव कमी असूनही सहजतेने वावरले. माधव आचवल (भास्कर) काही खास नाही. शशिकांत निकते (अच्युत) हा नवा नायक दिसला बरा. वागला मोकळेपणाने. पण समरप्रसंगात उणा वाटला. दत्ता चोडणकर यांचे नेपथ्य (सर्व अंक एकाच सेटवर) ठीकठाक ! रेखा डावजेकरचे 'थीम साँग' आहे पण त्याचा टेप स्पष्ट व स्वच्छ नाही. दत्ता डावजेकर यांचे पार्श्वसंगीत बहारीचे. हे चंदनाचे फूल 'उगवत' नसले तरी 'सुगंध' मात्र देत राहणार असे दिसते. नाटकाने रोहिणीचे 'स्टेचर' वाढले आहे. सर्वस्व समर्पणाचा एक नवा आविष्कार घडवला आहे. कालेलकरी नाटय त्यात यशस्वी झाले आहे.

**—चित्रगुप्त**

## 'अल्ला हो अकबर' नव्हे, 'झेलम'

**'दीपावली'च्या सप्टेंबरच्या अंकात माझ्या 'प्रचार' या लेखाचा उत्तरार्ध प्रसिद्ध झाला असून त्यात "प्रा. ना. सी. फडके यांनी 'अल्ला हो अकबर' या कादंबरीत शेख अब्दुल्ला यांचे कौतुक केले आहे." अशा आशयाचे विधान आहे. शेख अब्दुल्ला यांचे कौतुक 'अल्ला हो अकबर' या कादंबरीत नसून प्रा. फडके यांच्या 'झेलम' कादंबरीत आहे.**

**—दादुमिया**

# शाहीर अमरशेख



मृत्यूचेच नव्हे तर एकूण जीवनाचेच गणित मोठे विचित्र असते. व्यावहारिक गणिताप्रमाणे तेथे नेहमी दोन अन् दो चार होतील वा होतातच असे नाही. त्या गणिताला रीत नसते, गाइडे नसतात, असलीच तर ती खरोखर 'गाईड'च करतात असे नाही. किंबहुना कुठल्याही गाईडमध्ये बसणार नाहीत असेच जीवन आणि मृत्यू हे दोन विजय आहेत. इथे परबुद्धि चालत नाही आणि स्वतःची बुद्धि कधी कधी सुन्न होऊन बसते व मग 'नियति' असं म्हणत आल्या गोष्टी स्वीकारायला तयार होते. अन्यथा जन्म-जीवन आणि मृत्यु त्या बाबतीतली अनेक गुढे अनुत्तरितच राहतात. प्रश्न सरले असे जीवनात कधी होत नाही. मृत्यु तर उलट अनेक प्रश्न फेकीतच जीवनावर चाल करून येतो. कधी कधी अकल्पितपणे, अचानकपणे आणि एखाद्या सर्वनाशक साथीसारखा !

अन्यथा महाराष्ट्राच्या लाडक्या शाहीराच्या मृत्यूची–अमरशेख ह्या अमर सुपुत्राच्या मृत्यूची–संगति कशी लावायची ? महाराष्ट्राच्या वाटचाला अलिकडच्या काळात दोन उत्तम शाहीर आले होते. परमेश्वराचे देणे आणि महाराष्ट्राचे लेणे असेच ते प्रतिभासंपन्न पुरुष होते. अण्णाभाऊ साठे आणि अमरशेख ह्या दोघांचे मृत्यू महाराष्ट्राला चटका लावून गेले. एकापाठोपाठ ते घडले. अण्णाभाऊंच्या संबंधीची भावना गेल्याच अंकात व्यक्त केल्यानंतर ह्या अंकात लगेच लोकशाहीर अमरशेख यांच्या संबंधीची कृतज्ञता व्यक्त करण्याचा 'प्रसंग' येईल असे वाटले नव्हते. रीत नाही म्हटले ते ह्यामुळेच. अमरशेख ह्याना मी प्रथम पाहिले ते १९४२ साली पुण्यात. लकडी पुलाजवळच्या पंतांच्या गोटात मी नव्यानेच रहायला गेलो होतो तेथे ते मोडक ह्या नावाच्या एका मुसलमान मित्राकडे येत. मोडक कट्टर गांधीवादी. खादीधारी. पण राष्ट्रीय चळवळीत भाग घेणाऱ्या त्या वेळच्या तरुण मंडळीत एक नवे वारे खेळत होते. अमरशेख यांची ती उंच शेलाटी मूर्ति अजून डोळ्यासमोर आहे. कुरळ्या व विपुल केशसंभाराचे वैभव तेव्हाही तसेच होते. भव्य कपाळ, त्यावरच्या त्या स्वैरपणे रुळणाऱ्या छटा, जब्बा, धोतर असाच पोषाख तेव्हाही होता. त्यांची स्नेहशील मनमोकळी वृत्ती तेव्हाच आपुलकीचे बी पेरून गेली. 'राष्ट्रीय चळवळ' हा तेव्हा आम्हा सार्‍यांच्याच जिव्हाळ्याचा विषय होता. मार्ग भिन्न भिन्न असतील. परंतु ह्या देशाचे चित्र पालटण्याची जिद्द मनात फुलत होती. 'अमरशेख' हे तेव्हा काही फार मोठं नाव नव्हतं. पण 'हे अमरशेख' म्हटल्यावर "म्हणजे कोण ?" असे प्रश्नचिन्ह काही चेहऱ्यावर वागवावे लागत नसे. इतपत कीर्ती त्यानी त्याही काळात संपादन केली होती. त्यानंतरच्या काळात तर त्यांची कीरत सतत वाढतच गेली. पण कीरत हे त्यांचे स्वप्न नव्हते. जनजागरण व जनसेवा हे तर त्यांचे व्रत होते. सातत्याने वर्षानुवर्षे एका विशिष्ट माध्यमाचा वापर करून ती समाजसेवा रुजू करीत राहणे ही तशी सामान्य गोष्ट नाही. हे तो निष्ठेचेच काम ! आयुष्याचा अर्थ गवसला की माणसे अशी वागतात मग स्थल, काळ, बाह्य, लौकिक परिस्थिती त्यांच्या ध्येय ज्योति विझवू शकत नाहीत. अमरशेख ह्यांचे जीवन असेच अखेरपर्यंत ध्येयरत, कार्यरत राहिले आणि मृत्यूनेच पाश टाकले तेव्हाच ते ध्येयरत जीवन मूक झाले. अमरशेख यांचे व्यक्तित्व जसे प्रसन्न, संपन्न व उंच होते तसाच त्यांचा आवाजही पहाडी-पल्लेदार होता. ते नुसते गायक नव्हते. जागल्या होते. प्रचारक होते. आणि प्रचारात भावना उद्दीपनाचा भाग गृहितच धरलेला असतो. अमरशेखर यांच्या शाहिरीत काव्यापेक्षा नाटच आणि भावना उद्दीपनाचा भाग अधिक होता. उपहास, उपरोध, अभिनय, राग, त्वेष-द्वेषादि भावना चेहऱ्यावर आविष्कृत करण्याची पद्धत आदि अनेक साधनांचा वापर अमरशेखर यांनी केला. अमरशेख हे लाल कलापथकात असूनही ह्या देशाच्या राष्ट्रीय जीवनस्रोताशी ते अखेरपर्यंत इमानदार होते. १९६२ साली अनेक 'लाल' नेत्यांच्या राष्ट्रनिष्ठेची कसोटी 'चीन'ने घेतली. आणि त्यात भले भले चकले व चुकले. पण अमरशेख चुकले वा चकले नाहीत. वैश्विक साम्यवादी विचारधारा मानलेल्या माणसाला 'महाराष्ट्रा'ची व्यथा वेदना कळली व तिला त्यांनी वाचा फोडली. ते 'धर्म' मानीत नव्हते पण 'न्यायधर्म' 'सद्धर्म' 'नीति' मानीत होते. म्हणूनच त्यांचा प्रचार व त्यांची शाहिरी, त्यांचे नाटच वा त्यांची घसाफोड कधी खोटी वाटली नाही. बेगडी ठरली नाही. आंतरिक निष्ठेचा तो प्रस्फोटक तेजस्वी आविष्कार ठरला. लाल मूर्ति भंगल्या तरी त्यांच्या मनातली भारताची मूर्ति अखेरपर्यंत अभंग राहिली. अमरशेख कडवे होते पण कडवट नव्हते. प्रचारकी रुक्षता त्यांच्या व्यक्तित्वात कधी आली नाही. त्यांचा गप्पा व त्यांचा सहवास ही एक प्रसन्न अनुभूति होती स्नेहशीलतेचा, सौजन्याचा, माणुसकीचा, निरहंकारितेचा तो एक असामान्य 'अनुभव' होता. कला हे समाजाचे देणे आहे आणि ती फुले समाज-

चरणीच वहायला हवीत अशी श्रद्धा बाळगणारे व तसे वर्तणारे ते क्रियाशील सेवक होते. त्या कडकडणाऱ्या डफाने आणि खळाळणाऱ्या पहाडी आवाजाने स्वतः मात्र सतत संकटे, दारिद्र्य, हाल सहन केले पण अनेकांना लक्षावधि रुपयांची मदत मिळवून दिली. पण अहंकाराचा वारा त्या 'राजसा'ला वाऱ्याला नाही. म्हणूनच 'अमरशेख' ह्या नावावर अवघ्या महाराष्ट्राचे प्रेम होते. हा संसारी, फकीर त्यांचे दैवत होते. आणि महाराष्ट्र हे शाहीराचे परब्रह्म होते. आणि अचानक त्यांना अपघाती मृत्यु आला. पहाडी आवाज प्रवासात व प्रचारात असतानाच मूक झाला. अण्णाभाऊंच्या आघातानंतर मराठी शाहिरी परंपरेवर हा फार मोठा आघात झाला आहे असे मला वाटते. त्याच आघातात गुलाबराव जगताप हे त्यांचे ढोलकी वादकही मृत्युमुखी पडल्याने तीव्रता वाढली आहे. डफ फुटला आणि ढोलकी मूक झाली.

## श्री. ह. रा. महाजनी

महाराष्ट्राचे एक ज्येष्ठ, श्रेष्ठ पत्रकार, विचारवंत, साहित्यिक, नाटककार श्री. **ह. रा. महाजनी** ह्यांचा मृत्यूही असाच चटका लावून गेला. तो असाच अचानक आला. अपघाती नसला तरी अकल्पित होता. त्यांना हृदयविकार असूनही टणक व चिवट, युयुत्सु, जिद्दी हृदय लाभलेले असल्याने, त्यांचा हा विकार मात करण्याचा प्रयत्न करीत असूनही महाजनी चिंतनिका लिहीत राहिलेच होते. मृत्यूपूर्वीच्याच सप्ताहात त्यांचे लेखन प्रसिद्ध झाले होते. आणि स्वतंत्र, स्वयंप्रज्ञ, समर्थ आणि सव्यवसाची लेखन कर्तृत्वाचा प्रत्यय त्याही लेखातून मिळाला होता. महाजनी हे शास्त्री-पंडित असूनही रुक्ष नव्हते. त्यांच्या वाणी, लेखणी आणि वक्तृत्वात काव्य-नाटय-संगीत, रसिकता, बहुश्रुतता यांचा विलास आढळून येत असे. फड मारण्याचा त्यांचा स्वभाव होता. 'मॉक पार्लमेंट'चे काही कार्यक्रम मला आठवतात. त्यांची रसाळ व्याख्याने आठवतात, आणि नाटय संगीत ह्या विषयावरची त्यांची सप्रयोग व्याख्यानेही आठवतात. त्यांची प्रतिभा, स्वयंप्रज्ञा आणि मूलगामी चिंतन त्यातही दिसून येत असे. महाजनी हे नुसतेच पत्रकार नव्हते. झुंजार पत्रकार होते. आणि ही झुंजार वृत्ती त्यांनी पत्रकर्तृत्व संपादण्यापूर्वी केलेल्या राजकीय कार्यातून, अनुभवातून आलेली होती. विख्यात क्रांतिकारक मानवेंद्रनाथ रॉय यांची अनेक व्याख्याने मी ऐकली होती. क्रांतिकार्याच्या 'ग्लॅमर'पेक्षाही रॉय यांचे चिंतन नेहमीच मोठे व खोल स्वरूपाचे असे असे. त्यांच्या वक्तृत्वात ओज नव्हते, विद्युल्लतेची नृत्यक्रीडा नसे पण संथ शांत लयीतल्या त्या भाषणात प्रकांड पांडित्य व चिंतन असे. महाजनी यांच्या चिंतनात हे सामर्थ्य होते. शिवाय रसिकता, जिद्द या गुणांमुळे त्या चिंतनिकांना स्वतःचे असे सामर्थ्य, लालित्य, संपन्नता प्राप्त झालेली होती. महाजनींनी पूर्व आयुष्यात खूप हाल काढले. 'देशभक्ति' हा काही त्या काळी शौक नव्हता. ती एक निष्ठा होती. त्या अमोल निष्ठेसाठी जवळचे सारे 'मौलिक' गमावून ही माणसे सेवारत राहू शकत असत. रॉयवाद्यांना जो वारसा मिळाला तो काही सत्ता-विभवाचा नव्हता, तो राजकीय वनवासाचाच होता. खुद्द रॉय यानाही जसे कौतुक, जसा गौरव लाभायला हवा होता तसा लाभला नाही. त्यांच्या सेवेचे, विचारांचे, कार्याचे जितपत मूल्यमापन व्हायला हवे होते तसे लाभले नाही. महाजनी यांच्यासारख्या अनेकांना ह्या वनवासी अवस्थेतून जावे लागले. 'लोकसत्ते'ने मात्र त्यांना सर्व अर्थांनी चांगले, वैभवाचे, कर्तृत्वाचे दिवस दाखवले व महाजनी म्ह. लोकसत्ता व लोकसत्ता म्ह. महाजनी हे समीकरण सिद्ध होऊ शकले. जीवनात त्याना स्थैर्य लाभले व प्रतिष्ठाही लाभली. पण तो चमत्कार वा अपघात नव्हता. त्यांची साधनाही तशीच होती. महाजनींचा 'ईश्वराची आत्महत्या' म्ह. कथासंग्रह प्रसिद्ध झाला. शकुंतला, परि तू जागा चुकलासी अशी नाटके लिहिली. रविवारची 'चिंतनिका'ही पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली. परंतु पत्रकार महाजनी, वक्ते महाजनी, वाक्पटु महाजनी, संगीत समीक्षक महाजनी, ह्या त्यांच्या भूमिका अधिक गाजल्या. यशस्वी ठरल्या. 'शब्दकोडे' माध्यमातून लोकसत्ता वाढली हे तर खरेच. पण 'रविवारची लोकसत्ता' लोकप्रिय करण्यात त्यांचे पत्रकर्तृत्व, कल्पकता ह्याचा वाटाही मोठा होता व आहे. महाजनी गुणी होते. पण अखेर माणूसही होते. माणूस परिपूर्ण नाही तसे तेही नव्हते. म्हणून त्यांच्याबाबत अनेक समज गैरसमज होते—आहेत. पण अखेर माणसाचे मोठेपण त्याच्या उंचीवरून ठरवायचे असते. त्याच्या झेप घेण्याच्या ताकदीवरून ठरवायचे असते. महाजनी हे मोठे पत्रकार होते हे निर्विवाद!! ती उमेद, ते सव्यसाचित्व, रसिकत्व, अष्टपैलुत्व आणि ती जीवन निष्ठा—साऱ्यांनाच मी अभिवादन करतो.

—आदि

# ‘बेशिस्ती’चे नाटक ‘शिस्ती’त संपले ! !

‘मत स्वातंत्र्या’चा बंडाचा झेंडा ‘दिल्ली’ला खुद्द इंदिराजींच्या हस्ते उभारला गेला. आणि बंडाचा संदेश साऱ्या लाल पांढऱ्या वारकऱ्यांनी व धारकऱ्यांनी देशाच्या कानाकोपऱ्यात पोहचविला. आव्हाने–प्रतिआव्हाने झाली. हवेत वार निघाले. तलवारीचे पट्टे फिरवले गेले “शुरू हुआ है जंग हमारा” अशा थाटात पुरोगामी-प्रतिगामी, क्रांतिकारी विरुद्ध स्थितिप्रिय असा अंतिम लढा सुरू झाला आहे अशीही आवई उठवली गेली. वर्षानुवर्षे एकत्र कामे केलेली, एकमेकांच्या आधाराच्या शिड्या घेऊन विविध पदी चढलेली माणसे एकदम नकोत ह्या कळकट–मळकट, मोडक्या पिचक्या शिड्या अशा थाटात एकदम नव्या, सागवानी लाकडाच्या व समाजवादाच्या स्वर्गापर्यंत थेट, सरळ विनाअट व विनासायास पोहचविणाऱ्या शिड्या गवसल्याच्या थाटात माणसे बोलू लागली. ‘सिंडिकेट’ नावाचा एक नवा शत्रू ह्या देशात उत्पन्न झाला असून फाळणी, पाकिस्तान, चीन आदि मंडळींनी जवढी हानी ह्या देशाची केली नसेल त्याहून अधिक हानी हा शत्रू घडवून आणीत आहे असा हा आभास उत्पन्न केला गला. ‘सिंडिकेट’मुळे बंगाल हातचा गेला. सिंडिकेटमुळे केरळचे राज्य गमावले गेले. समाजवादाचा सूर्य उगवला नाही कारण सिंडिकेटने स्वतःच्या क्रियाशून्यतेचे (काळे) टोपले त्यावर धरले, कोटचवधी रुपये अमेरिका आदि देशांनी ओतले. त्यातून समाजवादाचे बी-बियाणे आम्ही सतत पेरले होते हो, पण हे सिंडिकेटचे ‘टोळ’ ते सोनेरी पीक राहूच देत नसत असाही आभास उत्पन्न करण्याचा प्रयत्न झाला. सिंडिकेटवाले प्रगतीच्या झारीत जाऊन बसले असून त्यामुळे समाजवादी प्रगतीचे अमृतसिंचन जनतेवर होत नाहीय् असेही भासविले जाऊ लागले. त्यामुळे अध्यक्षीय निवडणुकीच्या निमित्ताने सुरू झालेले हे ‘जंग’ आता काहीतरी सोक्षमोक्ष होऊनच संपेल असे बघणारांना वाटले. बघ्यांना नेहमी ‘निकाली कुस्ती’ हवी असते. तह, तडजोड, वगैरे सौम्य प्रकार बघवत नाहीत. मानवत नाहीत. आणि बाहेरच्या बघ्याना तर ते हवेच असते. कारण कुणाच्या तरी मोडल्या संसारावर स्वार्थाची पोळी भाजून घेण्याची सोय उपलब्ध होत असते. आणि अनेक संसार मोडून, त्या मढ्यांवरून जी चालत येते तीच ‘जनक्रांती’ अशीच ज्यांची सवंग क्रांतीची कल्पना असते अशांना तर अशी मोडतोड नेहमीच हवी असते. त्यामुळे ‘नेहरूंचे हात बळकट करा’ ह्या एके काळच्या घोषणेप्रमाणेच ‘इंदिराजींचे बाहू बळकट करा’ अशी नवी घोषणा लाल वर्तुळात दुमदुमली. डांग्यांनी ‘शड्डू’ ठोकला. देशशत्रूंची यादी तैयार असून सात खुनांसाठी (माफ असल्याने) सातवारी पिस्तुले भरून तयार असल्याचीही घोषणा केली. इंदिराजी ‘आमच्या’ पंतप्रधान असल्याचा त्यांना एकदम साक्षात्कार झाला व गिरी हे महान कामगार कल्याणकारी राष्ट्राध्यक्ष आहेत असा हा दावा त्यांनी



मांडला. चिन्यांनी आक्रमण केले तेव्हा चाचरत बोलणारे डांगे यावेळी चाचरले नाहीत. बंडाचा बावटा लाल रंगाचा(च) असतो ह्या सिद्धांतावर त्यांची नितांत श्रद्धा असल्याने त्यांनी ‘होशियार’चा आदेश दिला. आणि एरव्ही डावे, उजवे, उजवे-डावे, डावे-उजवे. अति डावे व अति उजवे असे विविध झेंडे मिरवीत ‘आम्ही वेगळे’ आहोत असा आभास उत्पन्न करणारे सारे कम्युनिस्ट एकदम एक झाले. (तसे ते एकच आहेत हे वारंवार दिसले–जाणवलेही आहे) आणि ‘यशापर्यंत लढूया’ ह्या निश्चयाने त्यांनी कमरा कसल्या. काँग्रेसला कशी व कुठल्या मार्गाने ‘पोहचवायची’ ह्याच्या योजनाही ठरल्या. सिंडिकेट नामक शत्रूवर चाल करून जाणारी व्यूहरचनाही ठरली. पंतप्रधान इंदिराजींचे खरेखुरे मित्र व रक्षणकर्ते आपणच आहोत असाही आभास उत्पन्न केला गेला. दुसऱ्यांच्या विघटनेवर व दुर्बलतेवरच क्रांतीची लाल कमळे उगवतात, फुलतात असा इतिहासाचा दाखला आहे. भारताला स्थिर शासन देऊ शकणारी आज तरी काँग्रेस ही एकमेव संघटना आहे. ती जर मोडली, तिच्यात विसंवादी सूर सोडून दिले तर त्या मोडीत निघालेल्या काँग्रेसच्या मढ्यावर क्रांतीची कमळे उगवतील असा विश्वास ह्या ताई-भाईंना वाटत होता. इंदिराजी वैयक्तिक महत्त्वाकांक्षा, अहंकाराने पेटल्या होत्या तेव्हा अशा संधीचा फायदा उठविण्यासाठी त्यांच्या हाती पेटते पलिते देणे हाच (लाल) धर्म असल्याने साऱ्या डाव्या शक्ती त्यांच्या पाठीशी उभ्या राहिल्या. काँग्रेसच्याच पाठिंब्यावर, सिंडिकेटच्याच शिडीवरून चढत-चढत इंदिराजी पंतप्रधान झाल्या ही वस्तुस्थिती आहे. परंतु त्यांनी ती शिडी फकून दिली आणि काँग्रेसच्या अधिकृत उमेदवाराचा पाडाव करण्याची जगाच्या इतिहासातील अजोड व आगळी कामगिरी पार पाडली. इंदिराजींच्या सामर्थ्याबद्दल एकीकडे त्यांचे अभिनंदनही करावेसे वाटते. तर एकीकडे त्यांनी पेरलेल्या बेशिस्तीला कडु फळे तर येणार नाहीत ना म्हणून चिंताही वाटते. राष्ट्रपती गिरी यांनी पहिला संदेश दिला तो शिस्त, ऐक्य वगैरेचा. परंतु संदेश म्हणून तो कितीही चांगला असला तरी श्रेष्ठींनीच आपल्या पायाखाली काय जळते आहे ते पाहण्याची गरज आहे. पक्ष तुडवून पक्षीय लोकशाही पद्धत यशस्वी कशी होईल ? शिस्त मोडून शिस्तीची झाडे कशी उगवतील ! बेकीची बियाणे पेरून ऐक्याचे वटवृक्ष कसे फुलणार आणि ते छाया तरी कशी देणार ? परंतु ही परिस्थिती पाहून ‘डाव साधेल’ म्हणून वाट पाहणाऱ्या मंडळींची काँग्रेस पक्षाने घोर निराशा केली आहे. ‘झाले गेले विसरून

जा' अशा आशयाची भूमिका घेतली गेली. 'शिस्तभंगा'ची भाषा बंद झाली. मोडतोड टळली गेली. ते 'पॅच-अप' असेलली. परंतु आज काँग्रेस मोडणे ही गोष्ट इंदिराजींच्या दृष्टीनेही उपकारक प्रवृत्ती तथाकथित सिंडिकेटलाही ते फायद्याचे नव्हते. एकसंघ पक्ष म्हणून काँग्रेस कितपत राहील हे यापुढे सांगणे कठिण असले तरी देशातील लोकशाही टिकायची असेल तर काँग्रेस टिकली पाहिजे. डांगे आणि कंपनीला इंदिराजी वा काँग्रेसचे सोयरसुतक नाही. ह्या देशाला लाल रंगरंगोटी करण्यासाठी ते कधीचे ब्रश घेऊन तयार आहेत. कम्युनिस्ट नेहमी पाठिंबा देतात वा विरोध करतात तेव्हा तो कधीही निर्व्याज, निर्हेतुक नसतो. ध्येयसिद्धीच्या दृष्टीने टाकलेले ते एक पाऊल असते. काँग्रेसमधील इंदिरा गटाने हे सारे ओळखून पावले टाकणे अगत्याचे आहे. घरच्याच मंडळींवर बार काढून काही साधणार नाही. उलट यातून केवळ पक्षाची, पक्षसिद्ध स्थिर शासनाची आणि त्यामुळे पर्यायाने देशाची हानीच होईल. अखेर लोकशाहीतला लोक प्रतिनिधी स्थिर राज्य देऊ शकतो ते एखाद्या सुसंघटित, शिस्तप्रिय आणि ध्येयनिष्ठ अशा पक्षाच्या पाठिंब्यावरच ! जनता हा शब्द तसा 'व्हेग' ही आहे आणि 'फिरता'ही आहे. म्हणूनच लोकशाही शासनावर श्रद्धा असणाराने जनतेच्या सुसंघटित शक्तीवरच—म्हणजेच पर्यायाने आपल्या पक्षीय शक्तीवरच स्थिरपद राज्य करता येऊ शकते ही गोष्ट नजरेआड करुन चालणार नाही. डांगे आणि कंपनी 'जयकार' आणि शिव्या दोन्ही खिशात वाळगून पण दृष्टी मात्र 'बाहेर' कुठे तरी लावून बसलेली व राष्ट्रीय निष्ठांपेक्षा 'लाल निष्ठा-विशेषतः मॉस्को निष्ठा मोठी मानणारी कंपनी आहे. आणि स्वातंत्र्य पूर्व कालात व नंतरही त्यांच्या धोरणाचा केंद्र ठरलेला नाही. मॉस्को-चीन मतभेद असलेच तर ते काळ वेळाबद्दलचे पद्धतीबद्दलचे आहेत. आणि काँग्रेस खिळखिळी होण्यात त्यांना हवी असलेली काळ वेळ लवकर चालून येण्याची शक्यता दिसत असल्यानेच ही मंडळी पूर्वी दिलेल्या शिव्या विसरून आज 'इंदिरायन' आळवीत असलेली दिसत आहेत. सं. सो. पा. या पक्षाला तर काँग्रेस-विनाशाशिवाय दुसरे काही दिसतच नाही. येन केन प्रकारेण तो सत्वर घडून यावा यासाठी ही मंडळी तूर्त स्वप्नरत आहेत. काँग्रेसबद्दल मला प्रेम नाही. गेल्या वीसबावीस वर्षात व त्यापूर्वी ही अनेक चुकीचे निर्णय तिने घेतले व त्याची जबर किंमत जनतेने मोजली हेही ढळढळीत सत्य आहे. परंतु १९६७ साली ह्या देशातल्या काँग्रेसला विटलेल्या जनतेने सर्व विरोधी पक्षीयांना शासनाची संधी दिली होती. परंतु मद्रास सोडून इतर सर्वच ठिकाणी संयुक्त शासनाचे प्रयोग करावे लागले. आणि त्यातून जे काही घडले ते शोभादायक वा अभिमानास्पद असे नव्हते असे खेदाने म्हणावे लागते. अकरणात्मक (निगेटिव्ह) भूमिका घेऊन पुढारीपण मिरवता येईलही कदाचित, पण राज्ये चालविता येणार नाहीत. स्वयंवर मोडून लग्न साधतेच असे नाही. सं. सो. पा., प्र. स. प., जनसंघ, कम्युनिस्ट डावे-उजवे, सं. वि. दले आदि सर्वच पक्षांना आज तरी एकसंघ शासन देणे अशक्य आहे. अशा वेळी एका कार्यक्रमावर श्रद्धा

(पान ६२ वर)

(पान ४५ वरून—लोहगड....)

मिळतो. पण तो ड्रायव्हर-कम-कंडक्टर असतो. त्याचा पोशाख अगदी निटनेटका व स्वच्छ ! बस थांबली की बटण दाबून तो दरवाजा उघडतो. मग बस यात्रींनी रांगेत उभे राहून त्याचेकडून तिकीट घ्यायचे. पुन्हा कळ दाबून दरवाजा बंद करतो व जोरात बस चालवतो. शिस्तबद्ध हालचाली, हाताने गडबड नाही की तोंडाने बडबड नाही. प्रत्येक बसमध्ये एक चालणारे सुबक टाईमपीस असते. वेळापत्रकाप्रमाणे बस चालली आहे की नाही ते कळते. बसमधील मखमली आसने पाहून बसमधून उतरू नये असे वाटे. बसचे दर मात्र महाग. आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे मोड देणारे यंत्र बस ड्रायव्हरजवळ असते. त्यामुळे मोडीची कटकट नाही. नाहीतर मुंबईला मोड नाही 'नोट जमा करता हूँ। ऑफीस जाव और कल चेंज मिल जायेगी' वगैरे 'वेस्ट' भाषा नाही. घर, खाणेपिणे, कपडे वगैरे जीवनावश्यक वस्तू महाग आहेत, पण मोटारी, रेडिओ वगैरे चैनीचा माल तौलनिक दृष्ट्या स्वस्त आहेत. भारतात परिस्थिती या उलट आहे. फिनलँडच्या अर्थव्यवस्थेचा हा विरोधाभास विचारार्ह आहे.

फिनी लोक दिसायला गोंड आहेत. तसेच स्वभावानेही! त्यांना आपल्या राष्ट्राचा फार अभिमान आहे. भारतीय दूतावासाचा रस्ता मला सापडेना म्हणून मी रस्त्यात विचारले तर दोन फिनी सद्गृहस्थांनी जवळजवळ फर्लांगभर माझ्याबरोबर येऊन हवी असलेली इमारत दाखविली. पुढच्या कोपऱ्यावर विचारा की वगैरे बेपवाईची भाषा नाही.

श्री जाखो या फिनी मध्यमवर्गीयाचे घरी एका संध्याकाळी गेलो होतो. त्याचे सर्व कुटुंबियास इंग्रजी येत होते. घरात टी. व्ही.-सकट अद्यावत सुखसोई ! आपण मृगाजिन पसरतो तसे रेनडियरचे कातडे त्याने घरात पसरले होते. श्रीमती जाखो मोठ्या बोलक्या होत्या व त्यांनी आम्हाला बटाटयाचे थालीपीठ व लोणी दिले. विशेष म्हणजे थालीपीठापेक्षा लोणी खाण्याचा अधिक आग्रह केला. हा अनुभव आम्हाला अपरिचित होता ! त्यावर पिण्याला Sour Milk म्हणजे भरपूर ताक दिले. स्योमी ही कृषिभूमी असल्याने दूधदुभते विपुल व सकस ! श्री. जाखो यांना भारताची आठवण म्हणून मी खादीचा टाय व अजिंठयाचे चित्रकार्ड दिले. परदेशात जाताना अशा छोटया वस्तू बरोबर न्याव्या व तेथे आपल्या यजमानांना नजर कराव्या. त्यामुळे भारत-विदेश सदिच्छा जरूर पोसल्या जातात. श्री. जाखो यांचे कमरेला चाकू होता. त्याने स्वतः तयार केलेले फर्निचर आम्हाला अभिमानाने दाखवले. स्कॅन्डेनेव्हियन देशांपैकी नॉर्वे हा मुख्यतः कोळयांचा देश वाटतो तर स्वीडन हा लोहारांचा. डेन्मार्क हा गवळयांचा आणि फिनलँड हा विशेषतः सुतारांचा देश वाटतो असे कुणीतरी म्हटले आहे ते मला या संदर्भात आठवले.

• • •

# केरळमधील




केरळ राज्यातील लोकजीवनाचे एक वैशिष्टच असे की, तेथील शहरे आणि खेडी ही एकमेकांशी इतकी एकरूप झालेली आहेत की, शहरांचा परिसर कोठे संपतो व खेडी कोठून सुरू होतात हे सहजासहजी लक्षात येत नाही.

केरळ राज्याची एकूण लोकसंख्या २ कोटी ८ लक्ष इतकी आहे. यापैकी ८५ लक्ष म्हणजे जवळजवळ ४१ टक्के इतकी १५ वर्षाखालील मुले आहेत. परिणामी तेथील शाळांमध्ये मुलांची संख्या अतोनात वाढलेली असून, राज्य सरकारच्या उत्पन्नाचा बराच मोठा भाग शिक्षणावर खर्च होत असतो.

याशिवाय केरळपुढे आणखी एक समस्या आहे. सुमारे ८५ टक्के लोक खेड्यात राहतात आणि ५० टक्के शेतकीवर गुजराण करतात. शेतकीवर अवलंबून असलेल्यांना जमीन अपुरी पडते. लोकवस्तीचे प्रमाण दर चौरस किलोमीटरला ५३६ म्हणजे अखिल देशाच्या मानाने एक-तृतीयांश एवढे पडते.

ह्या परिस्थितीत सुधारणा घडवून आणण्याच्या दृष्टीने अलीकडील काही वर्षांत उपाय योजण्यात आले आहेत. चालू वर्षाच्या मार्चपर्यंत २,९४,००० इतक्या नसबंदी शस्त्रक्रिया करण्यात येऊन, दीड लक्ष स्त्रियांना लूप बसविण्यात आले. दहा वर्षापूर्वी भारतातील जन्माचे प्रमाण ४.२ टक्के इतके होते. त्याच्याशी तुलना करता केरळातील हे प्रमाण ३.९ टक्के होते. आज त्या राज्यातील हे प्रमाण २.५ टक्क्यांवर आले आहे.

केरळातील लोकांचे जीवनच इतके खडतर आहे की कुटुंब नियोजनाचा संदेश त्यांना पोचविण्यात अडचणी आल्या नाहीत. उलट त्याचे महत्त्व त्यांना पटत असून, त्यांच्याकडून त्याचे स्वागतच होत असते. तेथे जमिनीची कमरता असून उद्योगधंद्यांमध्ये नोकऱ्यांच्या संधी फारशा नाहीत आणि कारकुनी नोकऱ्यांसाठी अटीतटीची स्पर्धा चालते. हजारो तरुण स्त्री-पुरुष नोकऱ्यांच्या शोधार्थ राज्याबाहेर जात असतात.

कुटुंब नियोजन कार्यक्रमाच्या सध्याच्या प्रगतीमुळे तेथील परिस्थितीत फारसा बदल होईल असे नाही आणि तेथील लोकांना त्याची जाणीवही आहे. सांप्रत जन्माचे प्रमाण २.५ टक्के असले तरीही प्रतिवर्षी लोकसंख्येमध्ये २२०० मुलांची भर पडतेच आहे. याचाच अर्थ पुढील १२ वर्षांत म्हणजे १९८१ पर्यंत लोकसंख्या ५८ लक्षांनी वाढेल. परंतु जमीन मात्र तेवढीच राहील आणि नोकऱ्यांच्या संधीतही फारशी वाढ होणार नाही. आणि याचसाठी तेथील प्रत्येक कुटुंबाच्या दृष्टीने कुटुंब नियोजन कार्यक्रमाला विशेष महत्त्व आहे.

केरळमधील कुटुंब नियोजन कार्यक्रमाच्या आजपर्यंतच्या यशाचे वैशिष्टच असे की, कुटुंब नियोजनाच्या तंत्राचा स्वेच्छेने स्वीकार करण्याच्या आवाहनास तेथील लोकांनी दिलेली उत्तम साथ. रेडियो, नाणीं, नाटकें, कथकलीसारखी नृत्यनाट्य व ज्यात



प्रायः स्त्रियाच भाग घेतात अशा विलपटु नावाने ओळखण्यात येणाऱ्या लोकगीतांद्वारे कुटुंब नियोजनाचा हा प्रचार केला जातो. यातील कलाकारही कुटुंब नियोजनाच्या कार्यक्रमाबद्दल अत्यंत आत्मीयतेने उत्सुकता दर्शवीत असतात.

या कार्यक्रमाचा आणखी एक फायदा झाला आहे आणि तो म्हणजे स्त्रिया काही प्राचीन परंपरागत निर्बंध झुगारून देत आहेत. स्त्रिया आता कुटुंब नियोजन केंद्राभोवती घुटमळत नाहीत तर थेट आत प्रवेश करतात आणि आपला कार्यभाग साधतात. त्रिवेंद्रम येथील निरोध कारखान्यात अनेक तरुण स्त्रिया व मुली काम करतात. तसेच, केरळमध्ये एका तरुण महिला डॉक्टरने जास्तीत जास्त स्त्रियांवर नसबंदी शस्त्रक्रिया करण्याचा विक्रम केला आहे.

भारतातील कुटुंब नियोजन कार्यक्रमाचा व्याप लक्षात घेता स्वातंत्र्यप्राप्तीनंतर हाती घेण्यात आलेला तो सर्वात मोठा समाज कल्याण कार्यक्रम आहे असे म्हटल्यास वावगे होणार नाही. अलीकडेच केरळातील एका लहानशा गावी आयोजित करण्यात आलेल्या परिसंवादामध्ये "समाजवादाची व्याख्या काय" असा एक प्रश्न विचारण्यात आला. तेथेच एका ग्रामीण वरिष्ठाने उत्तर दिले ते असे "सरकार देशातील प्रत्येक व्यक्तीच्या आर्थिक व सामाजिक कल्याणाबद्दल किती प्रमाणात आस्था वाहते यातच समाजवादाचे सार आहे. व्यक्तीच्या कल्याणाद्वारे देशाचे कल्याण साधणारा असा कुटुंब नियोजन कार्यक्रम हाच एकमेव कार्यक्रम आहे.

* *





अनुक्रमणिका



**कुटुंबनियोजनाची प्रचारिका एका खेडुत गृहिणीला 'लहान कुटुंब कसे सुखी राहू शकते' हे समजावून सांगत आहे.**

# सुखी संसाराचा संदेश

राजस्थानमधील उन्हाळ्यात एके सकाळी चंबळ नदीच्या किनाऱ्यावर कोटा जिल्ह्यातील सकतपूरा ह्या खेड्यात एक जीप गाडी येऊन थांबली. या जीपमधून काही स्थानिक कुटुंब नियोजन कार्यकर्ते बाहेर पडून ग्राम पंचायतीच्या इमारतीकडे चालू लागले. त्यांना घरोघर जाऊन कुटुंब नियोजनासाठी लोकांना प्रवृत्त करावयाचे असल्यामुळे ते ग्राम पंचायत इमारतीत गट चर्चेसाठी जमले.

या कार्यकर्त्यांचा प्रमुख नेता किंचित चिंताग्रस्त दिसला. कारण कोटा नगरपालिकेच्या हद्दीत जोरदार कुटुंब नियोजन मोहीम सुरू झालेली होती. एकाच वेळी एका मागोमाग शहराच्या निरनिराळ्या भागात कुटुंब नियोजन मोहीम सुरू करण्यात आलेली असल्यामुळे त्यासाठी त्यांना कार्यकर्त्यांची कमतरता भासू लागली. तसेच या मोहिमेसाठी महिला विस्तार शिक्षिकांची सेवा उपलब्ध होऊ न शकल्यामुळे सकतपूरा खेड्यातील महिलांशी संपर्क साधण्यात अडचण येत होती.

पण, ही शंका निराधार ठरली. कुटुंब कल्याण नियोजनाचा मूलभूत संदेश यापूर्वीच कानाकोपऱ्यात जाऊन पोहोचला होता. कारण त्या खेड्यातील बुरखाधारी स्त्री 'लूप म्हणजे काय ?', 'लूप बसविल्यानंतर कसे वाटते ?', 'लूपमुळे अधिक रक्तस्राव होतो काय ?' असे प्रश्न निर्भिडपणे विचारू लागलेली होती.

इडा ही इब्राहीमची पत्नी. स्वभावाने साधी आणि मोकळ्या मनाची. वयाच्या २८ व्या वर्षीच आठ मुलांची आई झालेली. लागोपाठ झालेल्या प्रसूतीच्या वेदना जाणणारी. आठ मुलांचे संगोपन करणे किती अवघड आहे याची जाणीव असल्यामुळे तिला यापुढे संतती नको आहे. पण नैसर्गिकरीत्या जनन थांबविण्याच्या काळास बराच अवधी लागत असल्यामुळे तिला दुसऱ्या पर्यायी मार्गाने आपले ईप्सित साध्य करावयाचे आहे.

यासाठी उपाय कोणता ? तिच्या शेजारणीने लूप बसवून घेतले होते; पण अति रक्तस्राव होत असल्याची तिची तक्रार होती. कुटुंब नियोजन अधिकाऱ्याने इडास आश्वासन दिले की, तिच्या बाबतीत लूप बसविल्यामुळे रक्तस्राव होण्याची भीती नाही; परंतु तिला यापूर्वीच आठ मुले झालेली असल्या कारणाने तिने शस्त्रक्रियाच करून घेतलेली बरी.

इडाचा पती इब्राहीम हा कर्तव्यदक्ष पती असल्यामुळे त्यास या वाढत्या महागाईच्या काळात आठ मुलांचे पालनपोषण करणे किती कठीण आहे याची जाणीव होती. 'नसबंदी' शस्त्रक्रियेबद्दल त्याने विचारणा केली व दुसऱ्या दिवशी आपल्या पत्नीसह कुटुंब नियोजन केन्द्र शिबिरास भेट देण्याचे कबूल केले.

कुटुंब नियोजनासाठी मोतीबाईचे मन मात्र इतक्या सहजतेने वळविता आले नाही. नयागांव खेड्यातील एका प्रमुख शेतकऱ्याची ती पत्नी होती. तिचे गावांतील स्त्रियांवर चांगलेच वजन होते. सहा वर्षांपूर्वी जेव्हा स्थानीय ग्रामसेविका प्रशिक्षण केन्द्राच्या ग्रामसेविकेच्या गटाने त्याच्या नेत्यासह नयागावमध्ये कुटुंब-नियोजनविषयक एक सभा भरविली होती. त्यावेळी मोतीबाईंनी प्रखर विरोध करून त्यांना धमकी दिली होती की कुटुंब नियोजन विषयावर त्यांनी काही बोलावयाचे नाही.

या विरोधामुळे खचून न जाता उत्साही कार्यकर्त्यांनी या आव्हानास तोंड देण्याची तयारी दर्शविली. त्यांनी नयागांवास कल्याण प्रकल्पासाठी प्रायोगिक क्षेत्र म्हणून निवडले आणि तिथे, आधुनिक शेतीच्या पद्धती, स्वच्छता, प्रौढ शिक्षण आणि त्याबरोबर कुटुंब नियोजनविषयक माहिती देण्यास सुरुवात केली. या सर्व कार्यक्रमामुळे रुढीप्रिय खेडवळांना जीवनाचा एक नवीन मार्ग मिळाला.

ग्राम सेविका प्रशिक्षण केन्द्रातील काही शिक्षिकांनी स्वतःच लूप बसवून घेऊन खेड्यातील स्त्रियांसमोर एक आदर्श ठेवला.

सरतेशेवटी मोतीबाईचे मन कुटुंब नियोजनासाठी वळविण्यात यश मिळाले. मोतीबाईंनी आपल्या पहिल्या सुनेस लूप बसवून घेण्याची अनुज्ञा दिली. दुसरी सून पहिल्या प्रथम लूप बसवून घेण्यासाठी नाराज होती. पण दोन, तीन बाळंतपणांनंतर तिने पण लूप बसवून घेतले. आता सर्व खेडूतांना मोतीबाईचे घर या बाबतीत आदर्श असे वाटते. तिची मुले आता कॉलेजमध्ये जात आहेत. शेतीचे यांत्रिकीकरण होत आहे. आता मोतीबाई स्वतः दुसऱ्या खेडवळ स्त्रियांनी कुटुंब नियोजनाची साधने वापरावीत म्हणून त्यांचे मन वळवीत आहेत व प्रचार करीत आहेत. मोरापा खेड्याच्या कांही स्त्रिया मोतीबाईना भेटावयास नयागांवला आल्या. मोरापा खेडे हे मोतीबाईचे माहेर. त्यांनी या स्त्रियांना लूप बसवून घेण्यासाठी प्रवृत्त केले व या स्त्रियांनीसुद्धा आपल्या पतींशी विचारविनियमय न करताच लूप बसवून घेतले.

* *










# अलिगढमध्ये झालेली जागृती

अलिगढ निवासियांच्यामध्ये सावकाश परंतु नकळत एक बदल घडून यत आहे. अलिगड ही विरमगांवच्या सरहद्दीवर वाढणारी एक वसाहत आहे. अहमदाबादपासून ६० किलो मिटर अंतरावर हे ठिकाण येते.

पितृसंबंध व धर्माच्या बंधनामुळे अलिगढवासियांनी आपल्या-भोवती एक तटबंदी निर्माण केली होती. त्यामुळे येथील जमातीत त्यांच्या नेत्याच्या पूर्व परवानगीशिवाय कोठल्याहि गोष्टीचा प्रवेश दुरापास्त झाला होता.

आज या वसाहतीचा नेता श्री. मियांभाई मलिकजी पटेल आहे. त्याचा व्यवसाय वकीलीचा असून पूर्वीच्या मुंबई राज्यात एकदा तो विधिमंडळाचा सदस्यही होता. त्याला एकूण ९ मुले आहेत. भारदस्त व्यक्तिमत्वाच्या या माणसाने सुरवातीच्या काळात कुटुंब नियोजन मोहिमेला साथ दिली नाही.

कुटुंब नियोजनाची कल्पनाच त्यांना निषिद्ध वाटत होती. कोणी व किती जणांनी या भूतलावर जन्म घ्यावा हे परमेश्वर इच्छेनुसार घडते. मानव हा निमित्तमात्र असतो, अशी त्यांची धारणा होती. त्यांच्या दृष्टीनें कुटुंब नियोजन म्हणजे परमेश्वराच्या अधिकार कक्षेत अगांतुक ढवळाढवळ होती. त्यांनी कुटुंब नियोजनाच्या कल्पनेचा निषेध केला व ती एक धर्मत्याज्य कल्पना मानली व या कल्पनेचे वारेहि मनाला शिवू नये याची त्यांनी खबरदारी घेतली.

त्यांच्या धर्मगुरूच्या नात्यातील कुटुंब नियोजन कार्यकर्त्याच्या आगमनामुळे परिस्थितीला निराळी कलाटणी मिळाली. हा कार्यकर्ता म्हणजे एक बाई होती. तिचे नाव बानूबेन बनसाहेब. ती लहान लहान सभा भरवीत असे व मोठमोठ्या सभांतूनही व्याख्याने झोडीत असे. आपल्या व्याख्यानातून कुटुंब नियोजनाच्या आवश्यकतेवर ती भर देई.

### छोट्या कुटुंबाचे तत्वज्ञान

खाणाऱ्या तोंडाच्या संख्येवर निर्बंध घातला तरच भावी आपत्ती निवारता येईल हे ती मोठ्या कळकळीने व हृदयाला भिनेल अशा भाषेत सांगे. नुसते खाण्याला घालणे म्हणजे सारे संपले असे नव्हे असे ती म्हणे. समृद्ध जीवन जगण्यासाठी मुलांना आवश्यक ते शिक्षण देणे जरूर आहे. जर मुलांचे संगोपन व शिक्षण व्यवस्थित व्हावे असे वाटत असेल तर त्यासाठी आवश्यक ती तरतूद करणे जरूर असून ही मुलांची संख्या कमी असेल तरच शक्य आहे असे ती सांगत असे. खुदाला आपल्या मुलांची कुतरओढ व्हावी अशी कधीही इच्छा असणार नाही. कुटुंबाच्या वाढीवर निर्बंध घालणे हे धर्मबाह्य नाही. तर मग यासाठी मुलांच्या संख्येवर जरूर ती मर्यादा घातली तर बिघडले कोठे ? यामुळे व्यक्तिगत कुटुंबाचाच नव्हे तर साऱ्या राष्ट्राचाच फायदा नाही का होणार ?

बानूबेनच्या या उपदेशाचा योग्य तोच परिणाम झाला. छोट्या कुटुंबामागील तत्वज्ञानाची त्यांना खात्री पटली. केवळ मूठभर



लोकांचे एक कुटुंब घेऊन ते अलिगड येथे आले होते. परंतु या छोट्या कुटुंबाचा पसारा आता ७०० च्या घरात पोचलेला होता. आणि तेही फक्त ६० वर्षाच्या कालात. ही भयानक वाढ काहीही करून थोपवलीच पाहिजे असे त्यांना वाटू लागले.

### वाढती जागृती

या नव्या वाढत्या जागृतीमुळे पुरातन काळापासून चालत आलेले गैरसमज निवळू लागले. बंदिस्त असा हा समाज हळूहळू कवचातून बाहेर डोकावू लागला. व आपल्या आर्थिक सुस्थितीसाठी कुटुंब नियोजन ही एक गरज आहे, या विचाराप्रत तो पोचला. बानूबेनने अलिगढ सोडण्यापूर्वी काही तरुण मंडळींनी नसबंदीसाठी आपली नावे नोंदली. चांगली गोष्ट लांबणीवर टाकू नये असे म्हटलेच आहे.

रहिमभाई या २६ वर्षाच्या तरुणाने प्रथम नसबंदी करून घेतली. त्याला ७ व ५ वर्षे वयाचे दोन मुलगे होते. तो आपला उदरनिर्वाह शेतीवर करीत असे. त्याचे सालाना उत्पन्न अवघे ३००० रुपये होते. कशी तरी गुजराण तो या उत्पन्नात करीत होता. आणखी एका मुलाची भर पडली तर सगळेच उलटेपालटे होणार असे त्याच्या मनाने घेतले व म्हणूनच त्याने या गोष्टीचा शेवट करण्याचा धाडशी निर्णय घेतला. जरी तो नसबंदीसाठी उतावीळ झाला होता तरी त्याने आपल्या तरुण पत्नीची संमती घेऊनच शस्त्रक्रिया करवून घेतली.

नझुद्दिन अहमद याची गोष्ट जरा निराळी होती. या ३२ वर्षे वयाच्या तरुणाला ३ मुलगे होते. सालाना केवळ १०० रु. च्या उत्पन्नात खर्चाची तोंडमिळवणी करणे त्याला जिकीरीचे जाई. म्हणून तो नसबंदीला उद्युक्त झाला. आता सुखाने जीवन व्यतीत करीत आहे. त्याला लैंगिक जीवनांत कसलीही कमतरता भासत नसून त्याला भावी जीवनाविषयी आता आशा व विश्वास वाटू लागला आहे.





अनुक्रमणिका

## समंजस कुटुंब

परंतु सर्वात अधिक समंजसपणा दिसून आला हिबतुल्ला इब्राहिम पटेल यांच्या ठायी. सतत आजाराने पिच्छा पुरविल्यामुळे ते अहमदाबाद सोडून अलिगढ या आपल्या गावी परतले होते. यांचे वय होते ४० वर्षांचे. त्यांना २ मुलगेही होते. परंतु १४ वर्षांपूर्वीच दुसऱ्या अपत्याच्या जन्मानंतर कुटुंब नियोजनाची कास धरली होती. त्यांना आपल्या इस्टेटीला भाराभर वारस नको होते. अधिक वारसात तिचे वाटप म्हणजे कोणालाच काही धड मिळत नाही असे त्यांचे मत होते. याच कारणासाठी त्यांनी कुटुंब नियोजनाचा अवलंब केला होता. त्यांची आई व आजी यांनी त्यांच्या व त्यांच्या पत्नीच्या मागे आणखी एक मुलगी तरी होऊ द्या असा धोशा लावला होता. ते त्याला बळी पडले नाहीत. कुटुंब नियोजनाच्या साधनांनीही त्यांना कधी दगा दिला नाही. श्रीमती हिवतुल्ला यांना पिल्स (तोंडाने घ्यावयाच्या गोळ्या) अधिक पसंत होत्या. परंतु इतरही साधनांचा त्या उपयोग करीत असत. अलिगढला आल्यावर श्री. हिवतुल्लांच्या प्रकृतीत सुधारणा होऊ लागली. शेतीला जोडून त्यांनी पोल्ट्री फार्मही सुरू केले व सुखी व समाधानी जीवन ते जगू लागले.

आता अलिगढमध्ये याबाबत बरीच जागृती झाली असून आर्थिक परिस्थितीवर मात करून आपले भावी जीवन समृद्ध व सुखी करण्यासाठी कुटुंब नियोजनाचा मार्ग कित्येक कुटुंब चोखाळू लागली आहेत. नव्हे ! त्यांना कुटुंब नियोनाच्या रूपाने समृद्ध व सुखी जीवनाची गुरुकिल्लीच मिळाली आहे.

## कानपूर येथील लूप कारखाना

कानपूर म्हणजे उत्तर प्रदेशाची औद्योगिक राजधानी ! विविध प्रकारच्या लहान मोठ्या वस्तू तेथे तयार होतात. या वस्तूत अलिकडेच आणखी एक समाजोपयोगी वस्तूची भर पडली आहे. आणि ही वस्तू म्हणजे भारतात खेडोपाडी माहिती झालेले लूप.

संपूर्ण देशाला लागणाऱ्या लूपचा आणि ते बसविण्यासाठी लागणाऱ्या साधनांचे उत्पादन कानपूर येथील या कारखान्यातून होते. एक कोटीपेक्षा अधिक लूप आणि जवळजवळ अडीच लक्ष इन्सरटरचे आजपर्यंत ह्या कारखान्यातून उत्पादन झाले आहे. राज्य सरकारच्या देखरेखीखाली सुरू झालेल्या या कारखान्याचे १९६५ मध्ये उद्घाटन झाले.

कानपूरच्या औद्योगिक विभागात हा कारखाना असून त्यात स्वच्छ हवा आणि प्रकाश यांची उत्कृष्ट योजना केली आहे. उत्पादन विभागात हवेत व इतरत्र अस्वच्छतेचा मागमूसही राहू नये म्हणून कटाक्षाने लक्ष दिले जाते. उत्पादित वस्तूला बाहेरील कोणताही संसर्ग होऊ नये याची जास्तीत जास्त काळजी घेतली जाते.

कारखान्यात अत्यंत स्वच्छ आणि शुद्ध वातावरणात लूप व ईन्सरटर तयार करण्यात येत असून उत्पादनाच्या प्रत्येक टप्प्यात ते तपासून पाहण्यात येतात. तसेच त्यांची रासायनिक व इतर तपासणीही होते. त्यानंतर चीफ इन्स्पेक्टोरेट ऑफ टेक्स्टाईल्स ॲण्ड क्लोदींग प्रयोग शाळेमध्ये त्यांची अखेरची तपासणी होते. वरील प्रयोगशाळेत तपासणी पूर्ण झाल्यानंतर लूप व इन्सरटर पॅकबंद करण्यात यतात व मध्यवर्ती सार्वजनिक आरोग्य आणि कुटुंब नियोजन मंत्रालयाच्या वाटप विभागाकड पाठविले जातात. कुटुंब नियोजन उपकरणांचा हा वाटप विभाग लखनौ येथील कुटुंब नियोजन विभागीय संचालकांच्या कार्यालयात असून, तेथून हे लूप व इन्सरटर निरनिराळ्या राज्यांकडे रवाना केले जातात. त्यानंतर ते राज्यांतील सर्व कुटुंब नियोजन केन्द्रांना पुरविण्यात येतात.

• • •

(पान ५८ वरून-दीपमाला)

असलेला एक संघटित पक्ष म्हणून कांग्रेस पक्ष टिकणे हे राष्ट्रहिताचे दृष्टीने महत्वाचे आहे. सिंडिकेट-इंडिकेट हे शब्द ह्या संदर्भात गैर लागू आहेत. पक्षीय लोकशाहीत पक्ष शिस्त नेहमीच महत्वाची असते आणि आपल्या देशाच्या राज्यघटनेत प्रांतांना अन्य राज्ये येण्याची शक्यता ध्यानी घेऊन, केंद्र सबल राखण्यासाठी पक्षीय शिस्त हा काच न मानता कर्तव्य म्हणून मानणे अगत्याचे आहे. शासनात व्यक्ति महत्वाची नसते असे नाही. पण शासनात 'शासन' व शासनांतर्गत काही पद्धती-योजना-शिस्त महत्वाची असते असे मला वाटते. बँकांचे राष्ट्रीयीकरण करून व त्यानंतर राष्ट्रपती निवडणुकीत मत स्वातंत्र्याची लढाई लढून पंतप्रधान विजयी झाल्या आहेत. त्या दृष्टीने त्यांनी अपेक्षा वाढविल्या आहेत. त्यांची पूर्ती करण्यासाठी सुद्धा ती जीवनश्रद्धा असणारा शिस्तबद्ध पक्ष व अनुशासन हे त्यांच्या पाठीशी उभे राहणे अगत्याचे आहे. त्या दृष्टीने इंदिराजींनीही 'शोडाऊन' अधिक ताणला नाही हे उत्तमच झाले. गिरी-पाठक आता प्रतिज्ञाबद्ध झाले आहेत. आता आपसात वाद काढीत नसण्यापेक्षा स्थिर अनुशासन देण्याची गरज आहे. तत्वे नेहमीच चांगली असतात. बँकांचे राष्ट्रीयीकरण आदि उपाय नेहमीच उपकारक ठरतील असे जर घडावेसे वाटत असेल तर त्यामागे योजना-शिस्त हवीच ! इंदिराजींनी पावले ज्या गतीने टाकली, विश्वासानें टाकली ती गति–तो विश्वास थक्क करणारा होता हे निश्चित ! पण आता सारे शांत झाल्यावर त्या गतीला क्रियाशील देण्याची गरज आहे. ते करताना होळीचे होळकर उपयोगी पडणार नाहीत तर राष्ट्रनिष्ठ, कांग्रेसच्या अनुशासनाला मानणारी 'घरची' माणसेच अधिक उपयुक्त ठरतील असे वाटते. तूर्त तरी 'बेशिस्ती'चे नाटक शिस्तीत संपल्या, संपविल्याबद्दल इंदिराजी, यशवंतराव, निजलिंगप्पादि सर्वांचेच मी अभिनंदन करतो.

–सारस्वत

